


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य परिषद : सभासदांना विनंती

महाराष्ट्र साहित्य परिषदेला सध्या अतिशय गंभीर अशा आर्थिक संकटाला सामोरे जावे लागत आहे. वीज, पाणी, कार्यालयीन खर्च, सेवकांवरील खर्च, प्रवास, वाहतूक, टपाल अशा सर्व प्रकारचे खर्च सतत वाढते आहेत. हे सर्व खर्च अत्यावश्यक पण परिषदेच्या नियंत्रणाबाहेरचे आहेत. मुद्रण, कागद, पत्रिकेचा आनुषंगिक खर्च यांतही गेल्या काही वर्षांत कमालीची वाढ झाली आहे. लेखकांना योग्य तेवढे मानधनही देणे परिषदेस शक्य होत नाही. परिषदेच्या खर्चातील मुख्य भाग महाराष्ट्र साहित्य पत्रिकेवरच करावा लागत आहे. खर्चाचे हे प्रमाण असेच वाढते राहिले तर पत्रिकेचे प्रकाशन अनियमित होईल किंवा काही काळाने पत्रिका बंदही पडू शकेल ! ( इतर साहित्यसंस्थांच्या नियतकालिकांना याच स्थितीतून जावे लागत आहे ) कदाचित नाइलाजाने ४० पानी अंक काढणे किंवा जोड अंक काढणे हा मार्ग स्वीकारावा लागेल. या कठीण स्थितीतून मार्ग काढण्यासाठी खालील उपाय योजणे जरूरीचे झाले आहे :

परिषदेचे अनेक जुने सभासद त्या त्या काळात रुपये शंभर किंवा दोनशे शुल्क भरून आजीव सभासद झाले आहेत. त्यांनी आपले शुल्क रुपये ५००/- होईल इतकी उर्वरित रक्कम परिषदेस स्वेच्छेने पाठवून अर्थसाहाय्य करावे अशी विनंती आहे.

पत्रिकेसाठी ज्यांना जाहिराती मिळवून देणे शक्य आहे त्यांनी त्या स्वरूपात अवश्य मदत करावी ही विनंती .

जाहिरातीसंबंधी या अंकात पृ. क्र. ६९ वर दिलेली माहिती पाहावी.

परिषदेच्या सभासदांची नावे-पत्ते यांच्या अद्ययावत नोंदी करण्याचे काम सध्या सुरू आहे. तरी सभासदांनी आपले बदललेले पत्ते त्वरित कळविण्याची तसदी घ्यावी. (प्रत्येक वेळी तीस-चाळीस अंक परिषदेकडे परत येत असतात.)

जे सभासद हयात नाहीत त्यांच्या संबंधितांनी किंवा परिचितांनी तसे परिषदेस अवश्य कळवून सहकार्य करावे अशी विनंती आहे.

**विशेष सूचना :** पत्रिकेचा हा अंक क्र. २९१ व क्र. २९२ (ऑक्टोबर १९९९ ते मार्च २०००) असा जोड अंक म्हणून प्रकाशित करण्यात येत आहे. यानंतरचा २९३ क्र. चा अंक एप्रिल-मे-जून २००० या कालावधीत प्रकाशित होईल, याची कृपया नोंद घ्यावी.

**- डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्याध्यक्ष**

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९१-२९२

ऑक्टोबर १९९९ ते मार्च २०००

□

संपादक

ह. ल. निपुणगे

□



□

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड,

पुणे ४११ ०३०.

दूरध्वनी : ४४७५९६३

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका



❑

मुद्रक-प्रकाशक : डॉ. वि. भा. देशपांडे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये तीस ❑ वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
अंक क्र. २९१-२९२ ❑ ऑक्टोबर १९९९ ते मार्च २०००
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.

# संपादकीय

ह. ल. निपुणगे

साहित्यक्षेत्रात दिवाळी अंकांना महत्त्वपूर्ण स्थान आहे. दरवर्षी सुमारे तीनशेपेक्षा अधिक दिवाळी अंक नियमितपणे प्रकाशित होतात. काही अंक बंद पडतात, त्यांची जागा नवीन दिवाळी अंक घेत असतात.

दिवाळी अंकांच्या विक्रीची मोठी उलाढाल होत असते. वाढत्या साक्षरतेच्या मानाने ती वाढायला पाहिजे तेवढी वाढत नाही, हे जरी खरे असले तरी ती वाढविण्यासाठी संपादक, प्रकाशक नाना तऱ्हेचे प्रयत्न करीत असतात. मॅजेस्टिक एजन्सीच्या श्री. अनिल कोठावळे यांच्यासारखे पुस्तक विक्रेतेही दिवाळी अंकांच्या खपासाठी विशेष प्रयत्न करताना दिसतात. त्यांनी तयार केलेल्या निवडक सात दिवाळी अंकाच्या संचाला व्यक्तिगत ग्राहक निर्माण करण्यात त्यांनी मोठे यश मिळविले आहे. असे संच सुमारे तीन हजारच्या आसपास खपतात असे समजते. असे प्रयोग इतरही काही संपादक-प्रकाशक करीत आहेत. वास्तविक, पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, नागपूर यासारख्या मोठ्या शहरातही असे प्रयोग कोणीतरी करायला हवे आहेत.

दिवाळी अंकांच्या विक्रीसाठी होणाऱ्या या प्रयत्नांबरोबरच अनेक दिवाळी अंकांचे संपादकही अधिकाधिक चांगले दिवाळी अंक संपादित-प्रकाशित करण्याचे प्रयत्न करताहेत हीही एक अत्यंत आनंददायक घटना आहे.

विविध विषयांवर दिवाळी अंक संपादित होत आहेत. त्यात आरोग्य, क्रीडा इत्यादी विषयांनाही महत्त्वाचे स्थान आहे. शतायुषीसारखे दिवाळी अंक यामध्ये आहेत. एखादा विषय घेऊन त्यावरच पूर्ण अंक संपादित करून त्या विषयाला संपूर्ण न्याय देण्याचे कार्यही काही दिवाळी अंक करीत आहेत. त्यादृष्टीने यावर्षीच्या श्री. अरुण जाखडे यांनी संपादित केलेला 'पद्मगंधा'चा अंक वैशिष्ट्यपूर्ण वाटतो. सौ. स्मिता पटवर्धन यांचा 'अभिजात' हा दिवाळी अंकही असेच विविध विषय गेली अनेक वर्षे सातत्याने देत आहे. ज्योतिष-भविष्य या विषयावरही अनेक दिवाळी अंक प्रकाशित होतात. त्यातील श्री. चंद्रकांत शेवाळे यांचा 'ग्रहांकित' यासारखे काही दर्जेदार अंकही आहेत. धार्मिक-अध्यात्मिक या विषयावरही 'श्री गजानन आशिष', 'स्वामी महाराज' या सारखे दिवाळी अंक प्रकाशित होत असतात. त्या त्या विषयांना त्यांचा वाचकवर्गही असतोच.

साहित्याच्या वैविध्याचा आढावा घेणाऱ्या 'ललित' सारख्या दिवाळी अंकाची तर



अनुक्रमणिका







वाचक वाट पाहात असतातच; पण त्याच बरोबर दर्जेदार साहित्याचे विशेष प्रयत्नाने संपादन करून निरनिराळे सामाजिक, राजकीय विषय हाताळणारे, 'महाराष्ट्र टाइम्स', 'दीपावली', 'दीपलक्ष्मी', 'साप्ताहिक सकाळ', 'विशाखा', 'हंस', 'मोहिनी' यासारखे अनेक दिवाळी अंक प्रकाशित होत असतात. त्यांना वाचकही वाढत्या प्रमाणात मिळतो आहे. 'सत्याग्रही', 'मिळून साऱ्याजणी', 'अंतर्नाद' यांसारख्या मासिकांच्या दिवाळी अंकांनाही साहित्यजगतात वाढती वाचकप्रियता मिळते आहे. मुखपृष्ठाच्या बाबतीतही अनेक दिवाळी अंकांनी निरनिराळे प्रयोग केले आहेत. कलात्मक मुखपृष्ठे दिली आहेत. या अंकात आम्ही संकलित केलेल्या दिवाळी अंकांतील लेखांच्या सूचीवरून विविध दिवाळी अंकांनी किती वैविध्यपूर्ण विषय हाताळले आहेत, हे वाचकांच्या ध्यानात येईल.

हे सर्व असले तरी अजूनही वाचकांचा हवा तेवढा प्रतिसाद दिवाळी अंकांना मिळत नाही असे वाटते. वाढत्या सुशिक्षितांचे प्रमाण लक्षात घेता दिवाळी अंकांचा खप अत्यंत अल्प होतो असेच वाटते. मराठी पुस्तके महाग असतात असे म्हणणाऱ्या वाचकांनी पन्नास-साठ रुपये किंमतीचा किमान एक जरी दिवाळी अंक विकत घेऊन वाचला तरी दिवाळी अंकाच्या खपाचे प्रमाण आणखी खूपच वाढेल आणि चांगल्या साहित्याच्या निर्मितीला त्याची मदतच होईल.

दिवाळी अंकांना मोठमोठ्या उद्योग-व्यावसायिकांनी जाहिराती देऊन सहकार्य करावे, यासाठीही प्रयत्न व्हायला हवेत. 'दिवा' या नावाने मराठी दिवाळी अंकांची एक संघटना मागील वर्षी स्थापन झाली आहे. या संस्थेच्या कामाला अजूनही म्हणावी तशी गती आलेली नाही. ती येण्यासाठी प्रयत्न व्हायला हवेत.

दिवाळी अंकांना पारितोषिके देण्याचे कार्यही अनेक संस्था करीत आहेत. त्यात महाराष्ट्र साहित्य परिषद, सांगली नगर वाचन मंदिर, मुंबई मराठी पत्रकार संघ इत्यादी संस्था भरीव काम करीत आहेत. अशा पारितोषिकांमुळे चांगल्या दिवाळी अंकांना उत्तेजन मिळते. पारितोषिके देणाऱ्या आणखी काही संस्था निर्माण व्हायला हव्यात. महाराष्ट्र राज्य शासन उत्कृष्ट साहित्य निर्मितीला पारितोषिके देऊन गौरव करते. त्याच धर्तीवर उत्कृष्ट दिवाळी अंकांनाही पारितोषिके देऊन त्यांचा गौरव करण्याची योजना नव्या महाराष्ट्र सरकारने केल्यास दिवाळी अंकाच्या निर्मितीला मोठीच मदत होईल. मुख्यमंत्री मा. विलासराव देशमुख यांनी यासंबंधी अवश्य विचार करावा, अशी सूचना करावीशी वाटते.

सर्व संपादकांनी दिवाळी अंकांमधून उत्तमोत्तम साहित्य प्रकाशित करून आपले वाचक वाढविण्यासाठी, वाचकांना दिवाळी अंकांकडे आकृष्ट करून घेण्यासाठी प्रयत्न केले पाहिजेतच आणि वाचकांनीही दिवाळी अंक विकत घेऊन वाचले पाहिजेत, असे वाटते.

□

# ललित-लेखन - इ. स. १९८० ते १९९९

ज्योत्स्ना आफळे

मराठी साहित्यात 'ललित लेखां'चा समावेश 'ललित गद्य' या वाङ्मयप्रकारात होतो. ललितगद्य हा एक संमिश्र असा वाङ्मय प्रकार आहे. निबंध, लघुनिबंध, गुजगोष्टी, ललित निबंध, ललित लेख अशी वेगवेगळी नावे धारण करीत आता हा वाङ्मयप्रकार 'ललितगद्य' या नावाने मराठी साहित्यांत स्थिरावला आहे. काव्य, कथा, कादंबरी, नाटक, चरित्रे - आत्म चरित्रे या वाङ्मयप्रकारात जे न बसणारे लेखन आहे ते म्हणजे लघुनिबंध, ललितनिबंध, प्रसंगचित्रे, अनुभव, आठवणी, व्यक्तिचित्रे, भावचित्रे, प्रवासवर्णने, विनोदी लेख, आत्मपर लेखन इत्यादींचा समावेश ललितगद्य या प्रकारात होतो.

ललितगद्याचा विचार करताना त्याची पूर्वपीठिका समजून घेणे आवश्यक आहे. इ. स. १५८० मध्ये माँटेन या फ्रेंच लेखकाने आपली 'एसे' ची दोन पुस्तके प्रसिद्ध केली होती. बेकन या इंग्लिश लेखकाने हा प्रकार इंग्रजीमध्ये आणला. १५९७ मध्ये त्यांचे पहिले 'एसे' चे पुस्तक प्रसिद्ध झाले. माँटेनची वाट पुसत पुढे अब्राहम काऊले याने १६६८ साली 'एसे' चे एक पुस्तक प्रसिद्ध केले. ते इंग्रजीमध्ये होते. एकोणिसाव्या शतकात रोमँटिक वृत्तीच्या चार्लस् लॅम्ब या इंग्लिश लेखकाने 'पर्सनल एसे' जन्माला घातला आणि याच मालिकेत पुढे स्टीव्हन्सन, चेस्टरटन, लिंड, ल्युकास, गार्डीनर अशा कितीतरी लेखकांनी आपल्या व्यक्तिमत्त्वानुसार 'पर्सनले एसे' विविध परीने विकसित केलेले आहेत. या मूळ इंग्रजी साहित्यातून प्रेरणा घेऊन मराठीमध्ये लघुनिबंध अवतरला. त्याचे आद्य प्रवर्तक म्हणून श्रेय कै. ना. सी. फडके यांच्याकडे जाते. १९२६ च्या जानेवारीच्या 'रत्नाकर' मासिकात त्यांची 'सुहास्य' ही गुजगोष्ट प्रसिद्ध झाली होती. तसेच १९२७ साली कै. वि. स. खांडेकर यांनी सावंतवाडीच्या 'वैनतेय' या साप्ताहिकातून 'रानफुले' या शीर्षकाखाली 'लघुनिबंध' लिहिण्यास सुरुवात केली होती आणि येथूनच मराठी साहित्यात लघुनिबंधाला सुरुवात झाली. याच्याआधी मराठी साहित्यात निबंध अस्तित्वात होता. चिपळूणकर, आगरकर, टिळक, शि. म. परांजपे, न. चिं. केळकर यांनी समाजजागृतीसाठी विपुल निबंधलेखन केलेले आहे. पण या निबंधाचे स्वरूप पूर्णपणे वैचारिक होते. ज्ञानप्रसार आणि तत्त्वप्रचार हे त्यांचे मूळ हेतू होते.

१९२६ ते १९४५ या काळात लघुनिबंधाला भरपूर लोकप्रियता लाभली. कै. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, अनंत काणेकर, ना. मा. संत, वि. ल. बर्वे, वि. पां. दांडेकर यांनी लघुनिबंधाचे दालन समृद्ध केले. या काळात कै. कुसुमावती देशपांडे, कृष्णाबाई मोटे, ताराबाई मोडक, कमलाबाई देशपांडे या लेखिकांनीही निवडक लघुनिबंध लिहून या दालनात भर घातलेली आहे.



अनुक्रमणिका






१९४५ नंतर मराठी साहित्याने नवसाहित्याचे वळण घेतले. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या जागतिक घडामोडी तसेच स्वातंत्र्याचे वारे वाहायला लागल्यानंतरची देशातील राजकीय परिस्थिती, यामुळे समाजजीवनात जी काही नवी मूल्ये रूजण्यास सुरुवात झाली त्याचा परिणाम साहित्यावरही झाला. साहित्यप्रकारांमध्ये बदल होत गेला. त्यांची नव्याने मांडणी आणि व्यवस्था कळत-नकळत होत गेली. या काळात लघुनिबंधाची बंदिस्त रचना जाऊन तो पसरट होत गेला. स्वैर आत्माविष्काराला महत्त्व आले. 'मी' चे व्यक्तिमत्त्व केंद्रस्थानी आले. लालित्याच्या अंगाने तो विकसित होत गेला. ललितलेख, अनुभव, आठवणी, व्यक्तिचित्रे, प्रवासवर्णन, पत्रे अशा अनेक अंगांनी तो विस्तारत गेला आणि अशा प्रकारे आशयातले बदल स्वीकारत लघुनिबंधाला पोटात घेऊन हा वाङ्मयप्रकार १९५० नंतर 'ललितगद्य' या नावाने मराठी साहित्यात स्थिरावला आहे.

१९५० ते १९९९ या काळात अत्यंत सकस आणि समृद्ध असे ललितलेखन केले गेलेले आहे. यामध्ये कै. प्रभाकर पाध्ये, कै. रा. भि. जोशी, कै. वि. वा. शिरवाडकर, श्री. पु. ल. देशपांडे, विंदा करंदीकर, गंगाधर गाडगीळ, डॉ. आनंद यादव, ग्रेस, विजय तेंडूलकर, कै. डॉ. इरावती कर्वे, दुर्गाबाई भागवत, शांता शेळके, शिरीष पै, इंदिरा संत, पद्मजा फाटक, मंगला गोडबोले, अरुणा ढेरे, रवींद्र पिंगे, डॉ. अनिल अवचट, व्यंकटेश माडगूळकर, श्रीनिवास कुलकर्णी वगैरे लेखकांनी विपूल लेखन केलेले आहे.

प्रस्तुत लेखामध्ये १९८० ते १९९९ या कालखंडातील 'ललितगद्याचा' विचार केलेला आहे. तसेच ललितगद्यातील फक्त ललित लेखसंग्रहांचा आढावा घेतलेला आहे. व्यक्तिचित्रे, प्रवासवर्णने, पत्रे, संस्मरणे यांचा विस्तारभयास्तव समावेश केलेला नाही.

१९८० ते १९९९ या कालखंडात प्रकाशित झालेली सत्तर लेखकांची एकशे अठ्ठेचाळीस पुस्तके आढळली. अनवधानाने काही राहूनही गेल्याची शक्यता आहे. या पुस्तकांची यादी या लेखाच्या शेवटी जोडलेली आहे. या पुस्तकांवर दृष्टीक्षेप टाकला असता असे आढळून येते की सर्वांत जास्त ललितलेखन श्री. रवींद्र पिंगे आणि श्रीमती शांता शेळके यांनी केलेले आहे. डॉ आनंद यादव, द. ता. भोसले, प्रा. चंद्रकुमार नलगे, इंद्रजित भालेराव, डॉ. प्रतिमा इंगोले यांनी आपल्या लेखांतून ग्रामीण जीवनानुभव टिपलेले आहेत.

'पाणभंवरे' या डॉ. आनंद यादव यांच्या लेखसंग्रहातील ललितलेख हे स्वानुभवाच्या अस्सल मुशीतून आलेले आहेत. ग्रामीण आणि शहरी अशा मिश्र अनुभवांचे दर्शन या लेखांतून घडते. ग्रामीण भागातून शहरांत आलेली व्यक्ती शहरी जीवनाशी नाते जुळवून घेते पण ती पूर्णपणे शहरी होत नाही. मनाला ग्रामीण भागाची ओढ असते, पण तिथंही ती 'परकेपण' अनुभवते. हा जो त्यांच्या व्यक्तिमत्त्वातला द्वंद्वात्मक ताण आहे तो येथे अत्यंत संवेदनाशील मनाने चित्रीत केला गेला आहे. ग्रामीण आणि शहरी असे दोन्ही जीवनानुभव घेताना झालेली मनाची तडफड येथे जाणवते. मनाचे दुभंगलेपण व्यतीत होते. शिक्षणाने माणूस सुसंस्कृत होतो, त्याचे व्यक्तिमत्त्व बदलते. त्याची जगण्याची शैली बदलते. अनवाणी पायात बूट येतात, पण पायाला लागलेली माती ते मन विसरत नाही. त्या मातीची ओढ त्या मनाला

असते याचा शोध घेत यादव येथे स्वत:ला शोधतात.

'बयनाचे बोल' हा डॉ प्रतिमा इंगोले यांचा अस्सल वऱ्हाडी बोलीतील लेखसंग्रह आहे. पारंपारिक स्त्रीगीते, ओव्या, म्हणी, वाक्प्रचार यांचा वापर करीत वैदर्भीय स्त्रीचं जगणं, तिचं भावविश्व डॉ. इंगोले यांनी उलगडून दाखविले आहे. काहीसं लोकसाहित्याच्या अंगाने हे लेखन जाते. वऱ्हाडी बोलीतला गोडवा आणि लेखिकेची ओघवती भाषाशैली त्यामुळे लेखांना वाचनीयता प्राप्त झालेली आहे. प्रा. चंद्रकुमार नलगे यांच्या 'गावाकडची माती', 'मंतरकैफ', 'झुंझुरक', 'चंद्रवनातल्या सावल्या', या लेखसंग्रहातून निसर्गसौंदर्याचे एक वेगळे दर्शन होते. ग्रामीण भागातल्या माणसाच्या रंध्रारंध्रातून निसर्ग किती एकजीव झालेला असतो याची प्रचीती हे लेख वाचताना होते. निसर्ग नुसताच पाहाणे, अनुभवणे हे येथे दिसत नाही तर निसर्गासह जगणे येथे दिसून येते. द. ता. भोसले यांचे 'आठवणीतला दिवस' आणि इंद्रजित भालेराव यांचे 'गाई घरा आल्या' या दोन्ही संग्रहातून ग्रामीण जीवनाचे विविध पैलू दिसून येतात. इंद्रजित भालेरावांचे लेखन काव्यात्मतेच्या पातळीवर जाताना दिसते.

श्रीमती शांता शेळके यांची धूळपाटी, पावसाआधीचा पाऊस, आनंदाचे झाड, एकपानी, संस्मरणे, रूपरंगी, सांगावसं वाटतं म्हणून, रंगरेषा, इतस्तत:, जाणता-अजाणता अशी पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. शांताबाईंनी प्रामुख्याने गतजीवनातील आठवणी, स्वत:ची साहित्यनिर्मिती प्रक्रिया, वाचन, पुस्तके, लेखकांच्या आठवणी, निसर्ग, मांजरे, जीवन जगताना येणारे अनुभव आणि त्यातून निघालेले निष्कर्ष यावर लिहिलेले आहे. एखादे जीवनाचे सूत्र सांगताना किंवा मानवी स्वभावाच्या छटा दर्शविताना त्याला अनुषंगिक अशी अनेक उदाहरणे देत देत त्या निष्कर्षाप्रत येतात. बालपणात रमणारे आणि जीवनाचा अनेक अंगांनी आस्वाद घेणारे मन त्यांच्या ललित लेखनातून प्रकट होते. आपण पाहिलेले, आपल्याला जाणविलेले, अनुभवलेले, मग ते दृश्य असो, घटना असो, पुस्तक असो, काव्याची एखादी ओळ असो ते दुसऱ्याला मुक्त मोकळ्या मनाने शांताबाईंना सांगावसं वाटतं. रसिकता हा शांताबाईंच्या व्यक्तिमत्त्वातला सर्वात मोठा गुण आहे.

शिरीष पै यांची अनुभवान्ती, मैलोन्मैल, टिप फुले टिप ग, कुणीच नाही, कोलाज, सय अशी पुस्तके दिसून येतात. अनेक स्तरांवर जगलेले जीवन त्यांच्या लेखनातून अवतरते. आचार्य अत्रे यांच्यातील त्यांचे 'पपा' आणि अत्र्यांमधील वक्ता, पत्रकार, विडंबनकार, संपादक, नाटककार, निर्माता, अशी अनेक रूपे शिरीष पैंनी आपल्या ललित लेखनातून न्याहाळलेली आहेत. पपांच्या सहवासातले क्षण, मराठाच्या संपादक म्हणून स्वत:ला आलेले अनुभव, व्यंकटेश पै बरोबरचा संसार, स्वत:ची साहित्यनिर्मिती, उमेदीच्या काळातले जीवन, नाना तऱ्हेची, नाना क्षेत्रातील माणसे आणि या जोडीला संपन्न निसर्गसाथ असे लेखन त्यांच्या संग्रहातून आढळते. यातील बरेचसे लेख त्रोटक आहेत, कालबाह्य वाटतात. एकच विषय पुन्हापुन्हा आलेला आहे, पण एका आंतरिक रेट्यातून हे लेखन स्फुरले आहे असे वाटते.

इंदिरा संतांच्या ऋजु, सात्त्विक, पारदर्शी स्वभावाची छाप त्यांच्या कवितेप्रमाणेच त्यांच्या ललितलेखनावरही पडलेली आहे. 'मृदगंध' आणि 'फुलवेल' अशी त्यांची पुस्तके आहेत.

वरवर सामान्य दिसणाऱ्या विषयातही आगळा जीवनानुभव टिपताना त्या दिसतात. तो सुद्धा अगदी सहज सोप्या शैलीत व्यक्त करतात. त्यांचे लेख हे स्व-मनाशी संवाद साधताना दिसतात.

'कदंब', 'अवतीभवती', 'स्वच्छंद', 'तळ्यात मळ्यात' असे विजया राजाध्यक्ष यांचे लेखसंग्रह आहेत. त्यांच्यामधली कथालेखिका आणि ललितगद्य लेखिका दोन्ही पूर्णतया भिन्न आहेत. त्यांचे ललितलेख कथेच्या पातळीवर जात नाहीत. गतकालातील स्मृती, भरपूर वाचनातून जाणवलेली जीवनसूत्रे, 'स्व'चा शोध, माणसामाणसातले गुंतागुंतीचे संबंध, सभोवतालच्या घडामोडीतून टिपलेले क्षण आणि त्यावरचे चिंतन ही वैशिष्ट्ये त्यांच्या लेखनातून जाणवतात.

'पहाटपाणी', 'शब्दासन' ही डॉ. सरोजिनी वैद्यांची पुस्तके आहेत. समाज, त्यातील माणसांचे जगणे, वागणे आणि त्यांचे स्वत:ला आलेले अनुभव यावर त्या नेमकेपणाने बोट ठेवतात. आस्वादलेल्या साहित्यकृतींसंबंधी लिहिताना त्यांनी आपली परखड मते नोंदविली आहेत. त्यातून त्यांची अभ्यासू आणि चिंतनशील वृत्ती दिसून येते.

आपल्या मार्मिक आणि विनोदी शैलीत समाजातील विसंगती मंगला गोडबोले यांनी टिपली आहे. 'झुळुक', 'पुन्हा झुळुक' 'अळवावरचे थेंब, 'आणि मी' ही त्यांची पुस्तके आहेत. रोजच्या जगण्यातले सुद्धा अनेक छोटे मोठे अनुभव असतात. माणसांच्या संवयी, लकवी, तऱ्हेवाईकपणा त्यातून दिसून येत असतो. याचे सूक्ष्म निरीक्षण मंगला गोडबोले करतात. पुस्तके, लेखक, गुरुजन, समाज त्यातील माणसे यांच्यासह जगताना स्वत:मधल्या 'मी' चा शोध त्या 'आणि मी' या पुस्तकात घेतात. मी कशी जगले याचे सिंहावलोकन करता करता भूतकाळाची वर्तमानाशी सांगड घालून आपल्या जीवन-जाणिवांचा शोध घेताना त्या दिसतात.

पद्मजा फाटक आपल्या मिस्किल आणि खुसखुशीत शैलीत लेखन करतात. 'माणूस माझी जात', 'सोनेलुमिएर', गर्भश्रीमंतीचे झाड', 'आवजो' ही त्यांची पुस्तके आहेत. पद्मजा फाटकांच्या लेखणीचे एक वैशिष्ट्य असे सांगता येईल की, एखादा विषय त्यांनी घेतला, मग तो प्रवासानुभव असो, गतकाळातल्या स्मृती असो, घरे दारे असोत किंवा निसर्गातील झाडे, समुद्र असोत त्याची सगळी रूपे त्या प्रकट करतात. एखादा अनुभव तारुण्य, प्रौढत्व आणि वार्धक्य या तीन स्तरावर कसा घेतला जातो याचे सूक्ष्म वर्णन त्या करतात. माणसातल्या विसंगती टिपतात, पण प्रतिक्रिया व्यक्त करताना कडवटपणाची धार त्यांना नसते.

'रूपोत्सव', 'लावण्यमाया', 'मनातलं आभाळ' हे डॉ. अरुणा ढेरे यांचे प्रकाशित लेखसंग्रह आहेत. वेदोपनिषदे, रामायण, महाभारत, धर्म व संस्कृती, लोकसाहित्य, लोकपरंपरा यांचे सखोल वाचन करताना जाणवलेले नवे विचार त्यांच्या ललितलेखातून झालेले आहेत. संस्कृतीच्या अनेक व्यक्त-अव्यक्त छटांना त्या उजाळा देतात. एखाद्या व्यक्तिरेखेतील जाणवलेले काही विशेष व्यक्त करताना पुन्हा पुन्हा मिथकाकडे वळणारे त्यांचे मन जाणवते. त्यांचे गद्यलेखनही काव्यात्म पातळीवर गेलेले दिसून येते.

'नदीकाठी' हे वासंती मुझुमदारांचे एकच पुस्तक आहे. यामध्ये लेखिकेने 'मी' चे अनुभव सांगताना ग्रामजीवन, कुटुंब परंपरा, संस्कृती, निसर्गाची रूपे, कुटुंबातील आणि अवती भवतीची माणसे यांचे दर्शन घडविले आहे. त्यांचे अनुभव हे सलगतेने आलेले आहेत. तुकड्या तुकड्यांच्या अनुभवांची गोळाबेरीच येथे नाही. त्यामुळे वाचनीयता वाढलेली आहे. यामधील 'पुरवणी पान' हा लेख उल्लेखनीय आहे. यामध्ये मी आणि आई, तसेच मी आणि माझी मुलगी असे मायलेकींचे नातेसंबंध त्या उलगडून दाखवितात.

श्री. रवींद्र पिंगे यांची सर्वात जास्त पुस्तके या कालखंडात प्रकाशित झालेली आहेत. 'बकुळफुलं फुलं मोहाची', 'आनंदपर्व', 'आनंदाची फुलं,' 'हिरवीगार पाने', 'पिंपळपाने', 'केशरी कमळ', 'सुखाचे पदर', 'रिमझिम पाऊस', 'अत्तर आणि गुलाब पाणी', 'काही चंदेरी', काही सोनेरी' ही त्यांची पुस्तके आहेत. पिंगे यांचे सर्व ललितलेखसंग्रह वाचून झाल्यानंतर तीन गोष्टी ठळकपणे जाणवतात त्या अशा की, पिंगे यांना आयुष्यात अनेक माणसांचा सहवास मिळालेला आहे. त्यांनी प्रवास खूप केलेला आहे. आणि तिसरे म्हणजे इंग्रजी मराठी साहित्याचे अफाट वाचन केलेले आहे. स्वत:च्या साहित्यावर त्यांचे उदंड प्रेम आहेच. ते 'मी कां लिहितो' सारख्या लेखातून व्यक्त होते, पण इतरांच्या साहित्यकृतींचा आस्वादही तितकाच मुक्त, मोकळ्या मनाने त्यांनी घेतलेला आहे. एखाद्या लेखकावर लिहिताना ते लेखकमय होतात, त्याच्या साहित्यकृतीची मर्मस्थळे सांगताना त्या लेखकाच्या अंतरंगात शिरून त्याच्या मनातले सुखाचे, दु:खाचे पदरही उलगडून सांगतात. निसर्गातल्या अनेक रूपांना स्पर्श करताना निसर्ग पाहणारा 'मी' त्यातून चांगल्या तऱ्हेने व्यक्त होतो. त्यांच्या लेखांची शीर्षके चपखल वाटतात. पुस्तकांच्या नावांवर दृष्टीक्षेप टाकला तर पाने, फुले, आकाश, पौर्णिमा, पाऊस, गुलाबपाणी, आनंद, सुख यांनी गुंफलेली नावे दिसतात. यातून जीवनावर भरभरून प्रेम करणारी ही व्यक्ती आहे हे जाणवते.

कै. श्री. ज. जोशींनीही आपल्या प्रसन्न शैलीत ललितलेखन केलेले आहे. 'पुणेरी', 'जोशीपुराण', 'भरती ओहोटी', 'सुचलं लिहिलं !', 'माझ्या साहित्याचा बॅलन्सशीट' ही त्यांची पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. श्री. जं चे सगळे आयुष्य पुण्यात गेले. त्यामुळे बदलते पुणे त्यांच्या लेखनातून येते. पुण्याची संस्कृति, पुण्यातील पेठा, रस्ते, ऐतिहासिक वास्तू, मुळामुठेचा परिसर, वाङ्‌मयीन वातावरण, पुण्यातील माणसे त्यांच्या वृत्तिप्रवृत्ती यावर श्री. ज. जोशींनी बरेच लिहिले आहे. 'आंदोलन' मासिकाच्या दिवाळी अंकात त्यांनी पहिल्यांदा 'डेक्कन जिमखाना संस्कृति' हा लेख लिहिला होता. आणि त्यानंतर ते पुण्यावर लिहितच गेले. त्यांच्या जीवनातील अनेक प्रसंग, घटना, त्यांचे साहित्यावरचे प्रेम यांची दिलखुलास चर्चा त्यांनी त्यांच्या लेखातून केलेली आहे. एका शहराचे बदलते सामाजिक जीवन त्यांच्या लेखातून अवतरते.

श्री. मारुती चितमपल्लींनी वन्यजीवनाचा अनुभव घेऊन त्यावर अभ्यास करून ललितलेखन केलेले आहे. त्यांची 'पक्षी जाय दिगंतरा', 'जंगलचे देणे', 'रानवाटा', 'चकवाचांदणं' 'घरट्यापलीकडे' ही सगळी पुस्तके म्हणजे एका प्रकारचा प्राणिकोशच आहे. हे वाचताना

असे जाणवते की या प्राण्यांच्या जीवनाला सुद्धा एक अर्थ आहे. त्यामध्ये घरटं विणणं आहे, सुरक्षितता शोधणं आहे, पिलांना चारा, उब देणे आहे, सहजीवन आहे, सूड, संघर्ष आहे, सवयी आहेत. लकबी आहेत. वृत्तीप्रवृत्ती आहेत. मारूती चितमपल्लींचे हे लेख संशोधनात्मक आहेत. पण ते लालित्य हा भाषिक गुणधर्म घेऊन येतात, त्यामुळे त्यांना वाचनीयता प्राप्त झालेली आहे.

नाटककार विजय तेंडुलकरांच्या लेखणीचे सामर्थ्य विलक्षण आहे. या कालखंडात त्यांची 'रामप्रहर!' आणि 'हे सर्व कोठून येते' ही दोन पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. लोकसत्तामध्ये डिसेंबर ९२ ते ९३ पर्यंत तेंडुलकरांनी 'रामप्रहर' हे सदर चालविले होते. त्यामध्ये १५० लेख लिहिले होते. त्यातील ९५ लेख या पुस्तकात समाविष्ट आहेत. विषयाचे वावडे तेंडुलकरांना नाही. या पुस्तकात अगणित विषयांवर त्यांनी लिहिले आहे. त्यामध्ये राजकीय घटना आहेत. सामाजिक परिस्थिती आहे, चंगळवाद, भोगवाद, संघर्ष, सत्तालोलुपता, भ्रष्टाचार, अनैतिकता यावर भाष्य आहे. मुंबईचा बॉम्बस्फोट आहे, बाबरी मशिदीचे उध्वस्तपण आहे. एखाद्या कलावंताचा परिचय आहे. दूरदर्शनवरचा कार्यक्रम, एखादा नाट्यप्रयोग, पत्रे हेही त्यांच्या लेखांचे विषय आहेत. कै. अनंत काणेकरांनी जसे गणूकाका हे काल्पनिक पात्र निर्मिले होते तसेच तेंडुलकरांनी 'कोवळी उन्हे' मध्ये विठ्ठलराव तिनईकर आणि 'रामप्रहर' मध्ये लिमये या दोन काल्पनिक पात्रांची निर्मिती केलेली आहे. एखाद्या विषयासंबंधी ते या पात्रांशी वाद घालतात. आपली परखड मते नोंदवितात. मानवी स्वभावाचे विविध नमुने, विविध छटा त्यांच्या लेखातून दिसून येतात. माणसाच्या 'आतला माणूस' ते जास्त उलगडून दाखवितात. त्यांची विधाने अस्वस्थ करतात.' 'हे सर्व कोठून येते' या पुस्तकातील 'मनुष्यहत्त्या' आणि मरेपर्यंत फाशी' हे दोन्ही लेख अंतर्मुख करणारे आहेत. फाशी जाणारा, फाशी देणारा आणि ती फाशी पाहणारा सामान्य मनुष्य या तिघांच्या मानसिक अवस्थांचे वर्णन 'मरेपर्यंत फाशी' या लेखात ते करतात. जीवनाच्या अंताचे हे दर्शन, पण त्यातले जिवंतपण तेंडुलकरांनी अचूक पकडले आहे.

'शब्राडे' आणि 'कवडसे' हे श्री. शं. ना. नवरे यांचे लेखसंग्रह आहेत. नवऱ्यांच्या ललितलेख हे कथेच्या जवळ जाणारे वाटतात. नाना तऱ्हेची, नाना वृत्तीची माणसे त्यांना भेटली आहेत. त्या माणसांच्या वोलण्या-वागण्यातून, दिसण्या-असण्यातून, कृती-उक्तीतून एखादे जीवनविषयक तत्त्व ते शोधत असतात आणि तोच त्यांच्या ललितलेखांचा विषय असतो. त्यांच्या लेखातला 'मी' थोडासा त्रयस्थपणाने, कधी मिस्किलपणे आजुबाजूने जग न्याहाळत असतो. लेखातून जाणवणारे अनुभवविश्व खूप मोठे आहे. सध्या रविवार सकाळमध्ये दर रविवारी प्रकाशित होणारे 'ऊनसावली' हे ललितलेखही याच प्रकारचे आहेत.

कै. माधव आचवलांच्या 'पत्र' या ललितलेखसंग्रहात निवडक अकरा लेख आहेत. माधव आचवल हे वास्तुशास्त्रज्ञ होते त्यामुळे एक वेगळी कलात्मक दृष्टी त्यांना होती. पु. ल. देशपांडे, सुनीता देशपांडे, विजय तेंडुलकर यांनी आचवलांवर जे लेख लिहिले आहेत त्यातून त्यांचे वहुआगामी व्यक्तिमत्त्व कळते. आणि हेच व्यक्तिमत्त्व त्यांच्या सगळ्या लेखांमधून

नकळतपणे उमटत गेलेले आहे. या संग्रहातले 'पत्र' 'निनी', 'अखेर' हे लेख वाचनीय आहेत. जीवन आणि मृत्यू या दोन्हींचेही चिंतन या लेखातून वेगळ्या प्रकारे जाणवले.

'कागदी वाण', 'झूम' ही दिलीप प्रभावळकरांची नर्म विनोदी शैलीत लिहिलेली दोन पुस्तके आहेत. 'अभिनेता' म्हणून आलेले अनुभव, सहवासात आलेली माणसे, आजुबाजूला घडणाऱ्या घटना, हे या पुस्तकातल्या लेखांचे विषय आहेत. काही नमुनेदार व्यक्तींना मारलेल्या कोपरखळ्याही आहेत.

'पैलू' हा विजय कुवळेकरांचा लेखसंग्रह. भ्रष्टाचार, गुन्हेगारी यामुळे समाजाची होणारी हानि, शिक्षणक्षेत्राची दुरावस्था, सहकार क्षेत्रातील मानवी मूल्यांचा ऱ्हास, फक्त कागदोपत्री असलेल्या विकासयोजना, राजकारणातील सत्तालोलुपता यांचा परामर्श घेत घेत काही प्रश्न उपस्थित केलेले आहेत. पत्रकाराच्या शोधक नजरेने ते समाजवास्तव टिपतात. यातील व्यक्तिचित्रेही मनाला भिडतात. 'दरवाजा उघडलाच नाही' हे मधू भोसले यांचे व्यक्तिचित्र अस्वस्थ करते.

डॉ. अनिल अवचटांची 'कोंडमारा', 'धागे आडवे उभे', 'गर्द', पूर्णिमा', 'वाघ्या मुरळी', 'स्वत:विषयी' अशी पुस्तके या कालखंडात आलेली आहेत. त्यांचे लेखन एका सामाजिक जाणिवेतून झालेले आहे. जीवनाची कल्पनारम्य चित्रे येथे येत नाहीत तर वास्तववादी चित्रण येथे दिसून येते. 'कोंडमारा'च्या अर्पण पत्रिकेतच ते लिहितात 'गावागावातल्या दहशतीविरुद्ध एकाकी लढणाऱ्या, अप्रसिद्ध कार्यकर्त्यांना हा थोडा हातभार'! त्यांचे लेखन हे इतर लेखकांपेक्षा खूपच वेगळे आहे. जेथे जेथे सामाजिक विषमता जाणवली तेथे तेथे अवचटांच्या लेखणीने प्रहार केलेले आहेत. त्यामध्ये वेश्यांचे प्रश्न आहेत. देवदासींच्या व्यथा आहेत. बुवाबाजीचे स्वरूप उघडकीस आणले आहे. जातीय दंगलीवर प्रकाश टाकला आहे, हमालांचे, कामगारांचे प्रश्न आहेत. स्त्रियांचे आर्थिक, सामाजिक, लैंगिक शोषण कसे होत आहे यांचे वेदनादायक वर्णन आहे. अंधश्रद्धेचे मूळ कसे फोफावते आहे याची वर्णने आहेत. धर्माच्या नावाखाली चाललेला धंदेवाईकपणा आहे. दलितांवरचे अन्याय अत्याचार आहेत, विडी कामगारांचे प्रश्न आहेत. अवचटांची ही पुस्तके म्हणजे महाराष्ट्रातील राजकीय, सामाजिक, आर्थिक परिस्थितीचे अहवालच आहेत. समाजातल्या तळागाळाचे विदारक दर्शन येथे होते. असे 'रिर्पोटाज' पद्धतीचे लेखन फक्त एकट्या डॉ. अवचटांनी केलेले आहे. घरात बसून अवचटांनी हे जग बघितलेले नाही, तर प्रत्यक्ष तेथे जाऊन त्यांनी माहिती घेतलेली आहे. त्यामुळे लेखन परिणामकारक झालेले आहे.

'मितवा' हा ग्रेस यांचा ललितलेख संग्रह आहे. याचे एकूण चार भाग आहेत. स्वप्नवेचणीचे शिलालेख, दंतकथांचे संदर्भ, एका वैराणसूक्तांचे अधांतर आणि भारचक्राचे तोल असे हे चार भाग आहेत. ग्रेसच्या लेखनाचे वैशिष्ट्य असे की ते वाचताना येणारी अनुभूती वेगळी असते. पण त्यावर विचार करताना त्यातला आशय पटकन सापडत नाही. जीवनाचे गूढ गंभीर दर्शन या लेखातून होते. पण त्याचा अर्थ शोधणे दुर्बोध होऊन बसते.

'पाण्याचे पंख' हा श्रीनिवास कुलकर्णींचा ललितलेख संग्रह आहे. या लेखातून आलेले

जीवनानुभव वाचले म्हणजे असे वाटते की दु:ख सुद्धा किती हळुवारपणे कुरवाळता येते. यातील 'आलोक' हा पहिला आणि 'हत्तीवाला' हा शेवटचा लेख मनाला स्पर्शून जातात. 'फुलाची वाट' आणि 'पाखरांची रात्र' हे दोन्ही लेख म्हणजे गद्यकविताच वाटतात. काव्यमयता, तरल संवेदनक्षमता, उत्कट भावानुभूती ही श्रीनिवास कुलकर्णी यांच्या ललितलेखनाची वैशिष्ट्ये आहेत.

'परवचा', 'सखा' आणि 'प्रवास एका लेखकाचा' ही व्यंकटेश माडगूळकरांची पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. 'परवचा' आणि 'सखा' ही दोन्ही पुस्तके वृत्तपत्रातील सदरलेखनातून तयार झालेली आहेत. एखादी बातमी, एखादा अनुभव, आवडलेली पुस्तके, जुन्या आठवणी, भेटलेली माणसे आणि यांच्या जोडीला खवल्या मांजर, रेडा, घोरपड, गाढव, रानडुक्कर, कुत्रा, चिंपांझी असं हे प्राणिजीवन आहे. अनुभवात विविधता आहे आणि त्या अनुषंगाने येणारी चिंतनशीलता आहे. 'प्रवास एका लेखकाचा' हे पुस्तक आत्मकथनात्मक वाटते. येथे माडगूळकरांचे घर येते आणि घरातले कुटुंबातले माडगूळकर दिसतात. त्यांच्यातील लेखक, चित्रकार, वनप्रेमी, शिकारी, शेतकरी, कलावंत, वाचक अशी जी रूपे आहेत त्याचे दर्शन या लेखातून होते. माडगूळकरांनी स्वत:च स्वत:कडे पण अलिप्तपणे पाहिल्याचे येथे जाणवते.

'वृक्षगान', 'फुलवा', 'हिराबाई' ही डॉ. शरदिनी डहाणूकर यांची पुस्तके तर 'चाफा बोलेना' हा विमला जोशींचा संग्रह म्हणजे फुलांचा शब्दोत्सव आहेत. येथे झाडांची पानाफुलांची शास्त्रीय माहिती तर मिळतेच पण फुलांची पण एक भाषा असते हे कळून येते. 'वैभव पेशवेकालीन वाड्याचे' हे डॉ. मंदा खांडगे यांचे पुस्तक जुन्या वाड्यांची तेथील परंपरांची ओळख करून देते. संशोधन करून मिळवलेली माहिती ललित अंगाने लिहिली असल्याने वाचनीय झालेली आहे. सुधा सोमण यांनी उच्चपदस्थ व्यक्तीची पत्नी म्हणून आलेले अनुभव 'मी अर्धांगिनी', 'लाल दिव्यांची गाडी' या पुस्तकातून सहज सोप्या शब्दांत मांडलेले आहे. पाश्चात्य देशात जीवन जगताना येणारे अनुभव विद्युल्लेखा अकलूजकर यांनी 'मेरा जुता है जापानी' या संग्रहातून मिस्किलपणे मांडले आहेत. 'गोठलेल्या वाटा' हे शोभा चित्रेचे पुस्तकही पाश्चात्य जीवनातले अनुभव भारतीय मनाने कसे टिपले जातात हे सांगते. उत्कट, काव्यात्म पातळीवरचे ललितलेखन शीला निपुणगे यांनी केलेले आहे. 'घर थकले संन्यासी' हे त्यांचे नुकतेच प्रसिद्ध झालेले पुस्तक आहे. कुटुंबातल्या व्यक्तींबद्दल त्यांनी अशा पद्धतीने लिहिले आहे की त्या व्यक्ती तुमच्या माझ्या घरातल्याच वाटतात. त्यांचे वेळोवेळी प्रसिद्ध झालेले ललितलेखही चांगले आहेत. त्यांचा संग्रह मात्र अजून प्रकाशित झालेला नाही. 'विलोरी' मधून माधवी कुंटे वेगळे जीवनानुभव न्याहाळताना आढळतात. नीलिमा मोने, विजया जहागिरदार, नीलिमा भावे, छाया महाजन, माधवी देसाई, सिसिलिया कार्व्हालो, अंजली कुलकर्णी यांनीही समृद्ध आणि सकस असे ललितलेखन केलेले आहे. श्री. आनंद अंतरकर यांचेही झुंजुरवेळ हे ललितलेखनाचे पुस्तक प्रकाशित झाले आहे. त्यांनीच आपल्या लेखनाविषयी म्हटले आहे, 'बऱ्याच प्रकारचे अनुभव गाठीशी होते. शिदोरी भरलेली होती. प्रवासाची विलक्षण आवड. प्रवासातील सौदर्यस्थळं, भेटत राहणारी विविध तऱ्हेची माणसं

घडणार आणि हे सारं संवेदनशीलतेनं निरखणारा आणि टिपणारा एक कॅमेराचा डोळा. कुठंतरी मनाच्या खोवणीत वसविलेला. पुष्कळसे तपशील या कॅमेरात वंदिस्त झालेले. हाच लेखकाचा तिसरा डोळा असावा.'

एकूणच १९८० ते १९९९ या काळातील ललितलेखनाचे स्वरूप पाहिले असता त्यात वेगवेगळ्या स्तरावर जीवनानुभव व्यक्त झालेले आहेत. गतकाळातील अनुभव-आठवणीत रमण्याची वृत्ती जाणवते. यामध्ये घर, आंगण, गांव, वाडे, निसर्ग, झाडे, नद्या, पाऊस, पशु, पक्षी, प्राणी, गुरूजन, मैत्रिणी, शाळा कॉलेजचे दिवस, वाचलेली पुस्तके, आवडलेले लेखक, कुटुंबातील माणसे, भेटलेली, न भेटलेली माणसे, टॅक्सी, वस, लोकलमधील प्रवासानुभव, देशापरदेशातील अनुभव, सामाजिक घटना, माणसामाणसांतले संवंध, त्यातील गुंतागुंत, अनाकलनीय मानसिक अवस्था, स्वत:ची साहित्यतनिर्मिती प्रक्रिया आणि यावरील जीवनविषयक चिंतन हे विषय प्रामुख्याने दिसतात.

या लेखनातून लेखकांची जीवनाचा अनुभव घेण्याची वृत्ती दिसून येतात. तेथे लेखकांची लौकिक, अंतरिक आणि वाङ्मयीन अशी व्यक्तिमत्त्वे दिसून येते. प्रत्येकाच्या अभिव्यक्तिची स्वतंत्र पद्धत दिसून येते. लेखनात सहजता आढळते. जीवनाकडे प्रसन्नपणे पाहाणे, त्याचे कोडे उकलणे, मानवी मनाचे खेळ अवलोकणे, सौंदर्याचा आस्वाद घेणे यांचे दर्शन या ललितलेखातून होते. प्रत्येकाची लेखनशैली त्याच्या स्वभावानुसार आलेली आहे हे जाणवते. हळुवार मनोवृत्ती, अभिजात रसिकवृत्ती, जीवनासक्ती, कलात्मकता, उत्कट चिंतन, ज्ञानपिपासू, विचारप्रवणता, स्थितप्रज्ञता, आत्मनिरीक्षकता, प्रयत्नशीलता, अशी ललितलेखकांच्या व्यक्तिमत्त्वांची जाणवलेली वैशिष्ट्ये सांगता येतील.

यातून जीवनाभिमुख, आस्वादक माणुसकीला जपणारी, आयुष्याकडे तटस्थपणे बघणारी, निसर्गात रमणारी, प्रेम करणारी, स्वाभिमानी, संघर्षाला सामोरी जाणारी, माणसाच्या चांगुलपणावर विश्वास असणारी जीवनदृष्टी प्रत्ययाला येते.

मराठी साहित्यात ललितगद्यातील ललितलेखांनी मोलाची भर घातलेली आहे. ललितलेखकांचे योगदान खूप मोठे आहे. डॉ. आनंद यादव म्हणतात की ललितगद्य हा आदिम आणि अंतिम साहित्यप्रकार आहे याची प्रचीति वरील लेखसंग्रहातून येते.

□

ज्योत्स्ना आफळे
७६/१०, 'सुयोग', शांतीशिला सोसायटी, लॉ कॉलेज रोड, पुणे ४११ ००४.

---

**स्वागत**

- **विज्ञान वेध :** मोहन आपटे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५८
- **प्रतिमेय :** सौ. मीनाक्षी सरदेसाई, प्रियांजली प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५१
- **निसर्गयात्रा :** अनिल दामले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२४
- **बखर एका डॉक्टरची :** डॉ. अनिरुद्ध फडके, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे २०२
- **माणूस नावाचा प्राणी :** निर्मल कुमार सूर्यवंशी, निर्मल प्रकाशन, नांदेड.

---

## ललितलेखसंग्रह - १९८० ते १९९९

- **कै. वि. वा. शिरवाडकर**
  १) बरे झाले देवा
  २) एखादं पान, एखादं फूल
  ३) मराठीचित्र नगरी
- **कै. माधव आचवल**
  १) पत्र
- **मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष**
  १) शालजोडी
  २) पंचम
- **राम शेवाळकर**
  १) आकाशाचा कोंब
  २) तारकांचे गाणे
  ३) पूर्वेची प्रभा
- **कै. राजा राजवाडे**
  १) घर आमचं कोकणातलं
- **विजय तेंडूलकर**
  १) हे सर्व कोठून येते?
- **डॉ. आनंद यादव**
  १) पाणभंवरे
- **श्रीनिवास विनायक कुलकर्णी**
  १) पाण्याचे पंख
- **ग्रेस**
  १) मितवा
- **केशव मेश्राम**
  १) छायाबन
  २) गाळ आणि आभाळ
- **चंद्रकुमार नलगे**
  १) गावाकडची माती
  २) झुंझुरक
  ३) अंतरकैफ
  ४) चंद्रबनातल्या सावल्या
- **मारुति चितमपल्ली**
  १) पक्षी जाय दिगंतरा
  २) रानवाटा
  ३) जंगलाचे देवा
  ४) रातवा
  ५) चकवा चांदणं
- **अनिल अवचट**
  १) कोंडमारा
  २) धागे आडवे-उभे
  ३) स्वत:विषयी
  ४) गर्द
  ५) पूर्णिमा
  ६) वाघ्या मुरळी
- **रवींद्र पिंगे**
  १)वकुळफुलं, फुलं मोहाची
  २) आनंदाची फुलं
  ३) आनंद पर्व
  ४) हिरवीगार पाने
  ५) पिंपळपाने
  ६) केशरी कमळं
  ७) दुसरी पौर्णिमा
  ८) सुखाचे पदर
  ९) अत्तर आणि गुलाबपाणी
  १०) रिमझिम् पाऊस
  ११) काही चंदेरी कांही सोनेरी
- **कै. श्री. ज. जोशी**
  १) जोशी पुराण
  २) भरती-ओहोटी
  ३) सुचलं ! लिहिलं
  ४) माझ्या साहित्याचा बॅलन्सशीट
- **डॉ. यू. म. पठाण**
  १) सय
- **यशवंत पाठक**
  १) ब्रह्मगिरीची सावली
  २) मातीचं देणं
- **इंद्रजित भालेराव**
  १) गाई घरा आल्या
- **देवीदास बागूल**
  १) शैशव दूत
  २) मोहोरणारी झाडे
- **मधू जामकर**
  १) पालवी
  २) आपुलाचि वाद
- **महावीर जोंधळे**
  १) कल्लोळ
  २) वारी
  ३) बाकी सहज सगळं
- **लक्ष्मीकांत तांबोळी**
  १) कबीराचा शेला
- **विलास पाटील**
  १) दंवातले आकाश
- **विजय कुवळेकर**
  १) पैलू










- **व्यंकटेश माडगूळकर**
  - १) वाघाच्या मागावर
  - २) प्रवास एका लेखकाचा
  - ३) परवचा
  - ४) सखा
- **रत्नाकर मतकरी**
  - १) शब्द, शब्द, शब्द
- **आनंद अंतरकर**
  - १) झुंजुरवेळ
- **मल्हार अरणकल्ले**
  - १) पहाटवारा
- **प्रकाश गोळे**
  - १) रानवारा
- **सचिन कांदोळकर**
  - १) खिडकीतलं जग
- **प्रल्हाद जाधव**
  - १) पाण्यातले दिवस
- **दादा धर्माधिकारी**
  - १) तरुणाई
- **प्र. श्री. नेरुरकर**
  - १) बकुळीची फुले
  - २) समुद्र स्पर्श
- **निर्मलकुमार फडकुले**
  - १) हिरव्या वाटा
  - २) आनंदाची डहाळी
  - ३) रंग एकेकाचे
- **सुभाष भेंडे**
  - १) जेथे जातो तेथे
  - २) हलकं फुलकं
- **विद्याधर म्हैसकर**
  - १) पक्षीगण उठले
- **विश्वास वसेकर**
  - १) रेघोट्या
- **मनोहर सप्रे**
  - १) फरसाण
- **राम क्षीरसागर**
  - १) चहाच्या टेबलावर
- **अनंत भावे**
  - १) वडापाव
- **श्रीमती दुर्गा भागवत**
  - १) दुपानी
  - २) डूब
  - ३) प्रासंगिका
- **श्रीमती शांती शेळके**
  - १) धूळपाटी
  - २) आनंदाचे झाड
  - ३) पावसाआधीचा पाऊस
  - ४) संस्मरणे
  - ५) एकपानी
  - ६) मदरंगी
  - ७) सांगावसं वाटतं म्हणून
  - ८) जाणता अजाणता
  - ९) रंगरेषा
  - १०) इतस्तत:
- **इंदिरा संत**
  - १) मृद्‌गंध
  - २) फुलवेल
- **शिरीष पै**
  - १) आतला आवाज
  - २) आजचा दिवस
  - ३) मी माझे मला
  - ४) अनुभवांती
  - ५) मैलोन् मैल
  - ६) टिप फुले टिप गं
  - ७) सय
  - ८) कोलाज
- **विजया राजाध्यक्ष**
  - १) अवतीभवती
  - २) तळ्यात मळ्यात
- **गिरीजा कीर**
  - १) लावण्य खुणा
- **डॉ. सरोजिनी वैद्य**
  - १) शब्दायन
  - २) संक्रमण
  - ३) माती आणि मूर्ती
- **मंगला गोडबोले**
  - १) झुळुक
  - २) पुन्हा झुळुक
  - ३) अळवावरचे थेंब
  - ४) अणि मी
- **शरदिनी डहाणुकर**
  - १) वृक्षगान
  - २) फुलवा
  - ३) हिरवाई
- **विमला जोशी**
  - १) कोथिंबिरीची फुले
  - २) चाफा बोलेना
- **डॉ. अरुणा ढेरे**
  - १) रूपोत्सव
  - २) लावण्ययात्रा
  - ३) मनातलं आभाळ
- **पद्मजा फाटक**
  - १) आवजो
  - २) दिवेलागणी
  - ३) सोनेलुमिएर
  - ४) माणूस माझी जात
- **विद्युल्लेखा अकलुजकर**
  - १) मेरा जूता है जपानी
- **निर्मला मोने**
  - १) झोपाळ्याचं घर
- **निलीमा भावे**
  - १) खूणगांठी
- **लीला बावडेकर**
  - १) निसर्ग खुणावतो आहे

- **प्रतिमा इंगोले**
  १) नयनाचे बोल
- **सिसिलिया कार्व्हालो**
  १) मोगऱ्याचा मांडव
- **निशिगंधा वाड**
  १) फुलपंखी
- **स्मिता तळवळकर**
  १) पिंपळ पाने
- **स्मिता भागवत**
  १) व्यक्त व्यक्त होताना
- **विजया जहागिरदार**
  १) आपलं मनातलं
- **रेणू पाचपोर**
  १) पाकळ्या
- **सुमेधा कामत**
  १) रानफूल
- **वासंती मुझुमदार**
  १) नदीकाठी
- **छाया महाजन**
  १) मोरबांगडी
- **लता राजे**
  १) परिक्रमा
- **अंजली कुलकर्णी**
  १) हृदयस्पर्शी
- **माधवी कुंटे**
  १) बिलोरी
- **सुधा सोमण**
  १) मी अर्धांगिनी
  २) लाल दिव्यांची गाडी
- **डॉ. मंदा खांडगे**
  १) वैभव पेशवेकालीन वाड्यांचे
- **शीला निपुणगे**
  १) घर थकले संन्यासी

□

---

# इंदिरा संतांच्या गावी

डॉ. मंदा खांडगे

'हे बेळगाव माझे आहे. कोणी म्हणतात की बेळगाव कुणाचे? मी म्हणते बेळगाव माझेच आहे. कारण इथल्या निसर्गाने, पावसाने माझ्या कवितेची लाल माती साकारली. मी शिकले. पुण्या-मुंबईतही राहिले, पण राहिले मात्र बेळगावातच. कारण बेळगाव माझे आहे.' साहित्य संस्कृती मंडळातर्फे ज्येष्ठ कवयित्री इंदिरा संत ऊर्फ आक्कांचा सत्कार गतवर्षी बेळगावात झाला त्यावेळी त्या हृद्य सत्काराला उत्तर देताना त्यांनी जे भावपूर्ण भाषण केलं त्यावेळचे हे उद्गार. बेळगाव ही आक्कांची कर्मभूमी. बेळगावाविषयी वाटणारं निस्सिम प्रेम असं शब्दाशब्दातून त्यांनी व्यक्त केलं. एका व्रतस्थ कवयित्रीचा हा गौरव. आयुष्यभर शीतल चांदणं कवितेच्या रूपाने त्यांनी रसिकांना दिलं. इंदिराबाईंचे जीवन म्हणजे निरांजनातील वात आहे जी स्वतः जळते आणि गाभाऱ्याला उजळते. देवालाही पावित्र्य देते. मुळातच इंदिराबाई साध्या, निगर्वी, सौम्य प्रकृतीच्या, संथपणे तेवणाऱ्या समईसारख्या. इंदिराबाईंची भावकविता म्हणजे मराठी साहित्याला लाभलेली अमूल्य देणगीच. त्यांच्या समकालीन कवितेमध्ये आपल्या वेगळेपणाने एकदम उठून दिसणारी. शब्दांविषयीची तरल जाणीव हे इंदिराबाईंच्या कवितेचे शक्तिस्थान. निसर्ग हा इंदिराबाईंच्या भावसृष्टीचा एक अविभाज्य घटक आहे. त्यातूनच त्यांची संपन्न प्रतिभासृष्टी निर्माण झाली. त्यांचा जन्मगाव तवंदी. पुणं, कोल्हापूर, बेळगाव जिथे जिथे त्यांचं वास्तव्य झालं तिथला समृद्ध निसर्ग त्यांचा जिवलग सहचर झालेला आहे. जवळ जवळ पाच दशकांपेक्षा जास्त काळ त्यांचं वास्तव्य बेळगावला झालं. प्राथमिक शिक्षणही बेळगावच्या मिशन स्कूलमध्ये झालं. संस्कारक्षम वय बेळगावातच गेलं. पुढे शिक्षणाच्या निमित्ताने पुणे-बेळगाव-मुंबई असे जाणे झाले. त्यामुळे त्यांना बेळगावाविषयी जास्त आत्मीयता. आपल्या या बेळगावला येण्याविषयी आक्कांनी कितीदातरी आग्रह केलेला. 'पद्माताईंच्या तासगावला आलात की तिथून पुढे बेळगावला या आणि दोनचार दिवस आमच्याकडे राहूनच जा' असा प्रेमळ आग्रहही खूप दिवसांपूर्वी झाला होता. पण बेळगावला जायचं राहून जात होतं. योग काही येत नव्हता. अलिकडच्या तीन एक वर्षांत इंदिराबाई पुण्याला आल्या नाहीत. किंबहुना प्रकृतीच्या तक्रारींमुळे त्यांनी प्रवास थांबवला. एरवी पुण्याला त्या आल्या की भेट व्हायचीच. पोट भरून गप्पा व्हायच्या. पण आता ते सगळं दुर्मिळ झालं आणि मग होत राहिल्या केवळ पत्रभेटी. आक्कांची पत्रभेट म्हणजे एक अपूर्व आनंदाचा ठेवा. त्यांच्या कवितेइतकंच त्यांचं पत्र उत्कट असतं. जणू काही पत्रातून त्या बोलतात, असं सहजसंवादी पत्र. पण आता



इंदिरा संत

*जन्म : ४ जानेवारी १९१४, तवंदी येथे.*
*शिक्षण : बी. ए., बीएड., पुणे-मुंबई विद्यापीठ*
*विवाह - प्रा. ना. मा. संत याच्याशी १९३६ मध्ये विवाहबद्ध.*
*व्यवसाय : अध्यापन-बेळगाव येथील मराठी ट्रेनिंग कॉलेजच्या निवृत्त प्रिन्सिपॉल.*
*वास्तव्य - बेळगाव*
*साहित्य - काव्यसंग्रह : सहवास -१९४० (ना. मा. संत याच्यासह), शेला - १९५१, द्वितीय आवृत्ती १९६३, मेंदी १९५५, मृगजळ १९५७, रंगबावरी १९६४, बाहुल्या १९७२, गर्भरेशीम १९८२, वंशकुसुम, चित्कळी, निराकार-प्रकाशनाच्या मार्गावर.*
*बालकविता : मामाचा बंगला, गवतफुला, अंगतपंगत, ज्योत्स्ना प्रकाशन, १९९५*
*कथासंग्रह : चेतू, कवली, इथामली.*
*ललित : मृदगंध, फुलवेल.*
*संशोधनात्मक : लोकसाहित्य, मालनगाधा, घुंघुरवाळा.*
*पुरस्कार :*
*१) मेंदी, रंगबावरी, शेला या कवितासंग्रहाला राज्यपुरस्कार*
*२) गर्भरेशीम-साहित्य अकादमी पुरस्कार, अनंत काणेकर पुरस्कार,*
*३) जनस्थान पुरस्कार,*
*४) आपटे वाचन मंदिर, मिरज पुरस्कार,*
*५) वनिता समाज दादर पुरस्कार,*
*६) डॉ. आर. नगरकर पुरस्कार,*
*७) महाराष्ट्र गौरव पुरस्कार*

प्रकृती अस्वास्थ्याने पत्र येणंही कमी कमी होत गेलं. बेळगावला आक्कांच्या भेटीला जायचं ठरवत होते. एवढ्यात बेळगावहून 'मंथन' या संस्थेच्या अध्यक्षा सौ. मृणाल जोशी यांचं पत्र आलं. 'संस्थेतर्फे बेळगावात बारावे महिला साहित्य संमेलन आयोजित करत आहोत त्याला अध्यक्ष म्हणून या.'' हे निमंत्रण मात्र मी तावडतोब स्वीकारलं. आक्कांच्या बेळगावचं आमंत्रण होतं ते. बेळगावला जायचा शेवटी असा योग आला. आक्कांना पत्रही घातलं.

रात्रीच्या आरामगाडीने निघून सकाळी बेळगावी पोहोचले. तेव्हा चांगलं फटफटलं होतं. झाडझाडोऱ्यातल्या बेळगावचं दर्शन होत होतं. जांभळट डोंगर, लालसर माती, माडापेडातून डोकावणारं निळसर आभाळ, पूर्वेचा लालिमा आणि स्वच्छ हवा. बेळगावात पाऊल टाकतानाच हे असं छान दर्शन होत होतं. स्टँडवर मंथनच्या कार्यवाह सौ. जयश्री देशपांडे आणि त्यांचे यजमान घ्यायला आले होते. ठळकवाडीत त्यांचा बंगला आहे. त्यांच्याकडेच राहण्याची सोय केली होती. बेळगाव परिसरातील कानडी हेलमिश्रित मराठी बोलणाऱ्यांची झलक या दांपत्याच्या बोलण्यातून जाणवत होती. बेळगावात मराठी आणि कानडीचा असा समन्वय आहे. अजूनही बेळगावचा प्रश्न भिजत पडलेला आहे. असो ठळकवाडीत रहायचं म्हटल्यावर मला खूपच आनंद झालेला होता. हा परिसर अतिशय निवांत, शांत. देशपांड्यांचा बंगला प्रशस्त, सुंदर. बंगल्यापुढे सुंदर बाग. बंगल्यात शिरेपर्यंत मी रस्त्याने इतरही घरांचं निरीक्षण करीत होते. प्रत्येक घराने बाग केलेली. अंगणात

फुलझाडी. परसात माड, केळी, आंब्याची झाडं, हवाही आल्हाददायक. त्यामुळे हे सकाळचं वातावरण हवंहवंसं वाटत होतं. देशपांड्यांच्या घरातली बाग पाहून तर आणखीनच सुखवायला झालं.

सकाळी पोहोचल्या पोहोचल्या इंदिराबाईंच्याकडे फोन केला होता त्यानुसार दुपारी वडगावातील त्यांच्या घरी जायला निघालो. मुख्य रस्त्यावर वाहन मिळेपर्यंत चालत राहिलो. अनेक वर्षं इंदिराबाई या ठळकवाडीत राहात होत्या. ते घर जयश्रीताईंनी दुरूनच दाखवलं. बेळगाव आधीच शांत. त्यातून हा परिसर आणखीनच शांत, सुंदर. ठळकवाडी हे नाव जरा मजेशीरच. पण असं समजलं की पूर्वीच्या काळात शांत सुंदर बेळगावात दरवर्षी प्लेगची साथ यायची आणि तीन-चार महिने टिकायची. अशा वेळी राहण्यासाठी बेळगावातील श्रीमंत लोकांनी जवळच्याच माळावर मोकळ्या जागेत सुंदर सुंदर प्रशस्त बंगले बांधले. पुढे अंगण मागे परस. छान बागा. अशी वस्ती इथे झाली, ठळक लोकांची वस्ती म्हणून या वसाहतीला 'ठळकवाडी' म्हणू लागले

काँग्रेसच्या विहिरीमागे हा आगरकर रोड. तिथली ही चार घरांची चाळवजा बंगली. त्यातलं मंगळौरी कौलांचं घर इंदिराबाईंना मिळालेलं. पुढे मागे छान अंगण. या निसर्गरम्य परिसरात इंदिराबाई वडगावला मुलाच्या स्वतंत्र वास्तूत रहायला जाईपर्यंत राहात होत्या. या भागात-ठळकवाडीत डॉ. याळगी यांच्या घराजवळच ही वास्तू आहे. ठळकवाडीला याळगी कुटुंबाचं वास्तव्य म्हणजे देशातल्या तमाम राजकीय कार्यकर्त्यांचं एकेकाळचं हक्काचं निवासस्थान. त्यांच्यासमोर पुढे रॉयवादी कार्यकर्ते म्हणून प्रसिद्धीस आलेले वा. रं. सुंठणकर यांचं बंगलीवजा घर. काँग्रेसचं १९२४ सालचं अधिवेशन बेळगावला झालं. महात्मा गांधी अध्यक्ष होते. तेव्हापासूनच ठळकवाडीतल्या विहिरीला काँग्रेसची विहीर म्हणू लागले. जयश्रीताई माहिती पुरवत होत्या. बाहेरूनच आम्ही इंदिराबाईंचं ठळकवाडीतलं घर पाहून घेतलं. घराभोवती छान प्रशस्त जागा होती.

रिक्षा पकडून आम्ही वडगावातील इंदिराबाईंच्या घराकडे निघालो. पूर्वी ठळकवाडी ते वडगाव हा इंदिराबाईंचा पायी चालत जाण्याचा रस्ता. आता बेळगावात खूप बदल झालाय म्हणे. अर्थात तो मला कसा समजणार? कारण मी बेळगाव प्रथमच पहात होते. आणि बदल होणं साहजिकच आहे. वस्ती वाढली की घरं वाढतात. रस्ते मोठे होतात. मोकळ्या जागा बांधकामाने व्यापल्या जातात. आता हेच पहा ना, इंदिराबाईंनी एके ठिकाणी लिहिलंय, अर्थात फार पूर्वी कारण त्यांना निवृत्त होऊनही बरीच तीस एक वर्ष झाली आहेत.' आमच्या टिळकवाडीतल्या घरापासून वडगावच्या माझ्या नोकरीच्या ठिकाणापर्यंतचा रस्ता माझ्या भावजीवनात सध्यातरी महत्त्व घेऊन बसला आहे. माझ्या कित्येक कवितांना त्या रस्त्यातच आकार दिला आहे. खानापूर रस्त्यानं टिळकवाडी (ठळकवाडी) रस्त्याची सीमा रेखली आहे. हा रस्ता तिथून उगवतीच्या दिशेनं एका लहानशा टेकडीवरून रांगत गेला आहे. या रस्त्याच्या दोन्ही बाजूला विस्तीर्ण माळ पसरलाय. डाव्या क्षितीजाला बेळगाव शहराची झाडीतून दिसणारी किनार आहे. तर उजव्या क्षितिजापाशी मोरपंखी डोंगररांगा.

चढणीच्या टोकाशी एक मोठं पावसाळी तळं. त्याच्या दूरवर मारुतीचं देऊळ. मंदिराला धुसर आहे. म्हणून यासर्व माळाला धुमरमाळ असं कुणीतरी नाव दिलं. जिथं उतार संपतो तिथं आंबे, फणसाच्या झाडीतून आणि कळकांच्या बेटातून वडगावची चाहूल लागते आणि रस्ता संपतो. अशा रस्त्यानं मी रोज चालत असते. कोणत्याही ऋतुत ऊन पाऊस वाऱ्यात. त्या रस्त्यावर पाऊल टाकलं की तो मला आपल्याच विश्वात घेऊन जातो. त्या रस्त्यावर जसा माझा जीव जडला तसा त्या तळ्याकाठच्या दगडांवर, विजेच्या तारावर, शेतावरच्या बांधावरही. त्या सगळ्यांनाच माझ्या भावजीवनात प्रवेश मिळाला.'' त्यावेळच्या टिळकवाडीत वडगावच्या या निर्मनुष्य माळावरच्या रस्त्यावरून जाताना इंदिराबाईंनी कितीतरी कविता केल्या.

*'ही निळी पांढणी शरदातील दुपार*
*तापल्या दुधापरि उन हिचे हळुवार*
*त्या उन दुधाचे घुटके घेत खुशाल*
*सुस्तीत लोळतो खाली हिरवा माळ*
*अन् बसल्या तेथे गाई करित रवंथ*
*वारीत झोपल्या, कोणी चरती संथ'*

नव्हे ! अशा सजीव, निर्जीव साऱ्यांनाच त्यांच्या काव्यात स्थान मिळालंय. शेतावरील बांधावरून चालतानाच मेंदी या कवितेला रंग भरला. तो याच रसत्यावरचा. आणि हिरवं काजळ डोळ्यांत चढल्यावर दिसणारा दगड तोही इथलाच. 'मेंदी' ची कितीतरी पारायणं केली तरी ती परतपरत वाचावीशी वाटते. 'मेंदी' कॉलेजात असताना अभ्यासलेला संग्रह. आम्हाला तो प्रा. गं. बा. सरदारसरांनी शिकवला होता.

*'मेंदी भरल्या नखानखांचे*
*आले चालत पिवळे पाऊल*
*ओल्या मुरमी बांधावरल्या*
*बाळतणाला लागे चाहूल'*

बाळतण हा शब्द मला फारच आवडलेला.

*'घट्ट धरून वाऱ्याच्या बोटा*
*उभे राहिले करून दाटी*
*लाल पऱ्यांची जर्द विमाने*
*बघताना थरथरली पाती'*

हे चलचित्र मोहक तर खासच.

रिक्षा वडगावच्या रस्त्याला लागली होती. ठळकवाडी-वडगाव अंतर दोन मैलांचं आहे. मध्ये अगदी लहानशी टेकडी. टेकडीच्या पायथ्याशी वडगाव आहे. एकेकाळी हा रस्ता निर्जन असा होता. इंदिराबाईंना कधी एकदा भेटीन असं झालं होतं. चार वाजायला आले होते. जयश्रीताईंना घर माहीत असल्याने शोधायचा प्रश्न आला नाही. बंगल्याच्या गेटमधून आत शिरताना लक्ष वेधून घेतलं ते सुंदर सुंदर फुलझाडांनी. दर्शनी भागातून फुलझाडाचं ते मोहकपण न्याहाळीत अंगणातून आम्ही त्या भव्य वास्तूत प्रवेश केला. इंदिराबाईंचा लाडका निसर्ग असा घरातच बहरलेला. 'फुलवेल' मध्ये इंदिराबाईंनी एका लेखात लिहिलंय, 'या अंगणाने माझ्या मनाचे नेणिवेचे फाटक उघडून आपल्याजवळचा निसर्ग त्याच्या रूप रंग गंधासह मोठ्या मनानं उधळला होता. ही एक माझी वेगळीच जाणीव होती. ही माझी आवड रवीच्या घरानं पुरवली आहे. त्यांच्या घराला अंगण नसून घरच उपवनात वसल्यासारखं आहे. थोडासा बरड माळ, थोडासा हिरवागार गालिचा अस्ताव्यस्त वाढलेल्या वेली आणि वृक्षामागून दिसणारे आरसे, महालासारखे आकाश - हत्तीच्या

कळपासारखे उधळत निघालेले मेघखंड, ऊन-सावल्यांचे मनसोक्त खेळ या सर्वांचे सुरेख मीलन या उपवनात आहे' किती सुंदर वर्णन केलंय इंदिराबाईंनी! इंदिराबाई वाटच पहात होत्या. त्यांना खूपच आनंद झाला. उरी, भेटाभेटी झाली. मी वाकून नमस्कार केला. भेटीमध्ये तीन वर्षांचं अंतर पडलं होतं. इंदिराबाई खूपच थकलेल्या वाटत होत्या. आता ऐकायलाही खूप कमी येतं. संवाद साधता येत नाही. प्रश्न पडतो. भेटीचा आनंद प्रसन्नपणे चेहऱ्यावर जाणवत होता. हाती हात घेऊनच त्यांच्या खोलीत आम्ही स्थानापन्न झालो. मी जयश्रीताईंचा परिचय करून दिला. ठळकवाडीत रहाण्याऱ्या म्हटल्यावर पूर्वीच्या आठवणीत यांनी काढल्या. घरात इंदिराबाई एकट्यात होत्या. सोबतीला घरकाम करणारी बाई. सूनबाई दीपा आणि चिरंजीव रवी इंदिराबाईंच्या नातीच्या म्हणजे पुष्पाताईंच्या मुलीच्या लग्नाला जालन्याला गेले होते. रवी आर्किटेक्ट असल्याने त्यांनी बंगला मोठा छान बांधलाय. प्रशस्त. इंदिराबाईंनी सगळं घर हिंडून दाखवलं. इथेही झोपाळा आहेच. इंदिराबाईंना झोपाळा फार आवडतो. पुण्यात त्या ना. सी. फडके यांच्या घरी उतरल्या आणि आपण भेटायला गेलं की त्या नेहमी झोपाळ्यावरच बसूनच गप्पा मारत. घर हिंडून आम्ही मागच्या मोकळ्या अंगणात इंदिराबाईंचे फोटो काढले. नंतर त्यांच्या खोलीत येऊन बसलो. इंदिराबाईंनी त्यांची मैत्रिण संजीवनीताईंची (मराठे) चौकशी केली. रामकाकांची प्रकृतीची चौकशी केली. (रामकाकांचे नुकतेच निधन झाले आहे.) एकेकाळी संजीवनीताई वेळगावात रहात होत्या. तेव्हा त्याचं मैत्र जुळलेलं. काव्य हा





अनुक्रमणिका

मैत्रीचा समान धागा. त्या काळात पार्वती महाविद्यालयात ना. मा. संत शिकवत. वि. म. कुलकर्णी, निकुंबही शिकवत. ठळकवाडीत शेजारी गं. ब. ग्रामोपाध्ये रहात. शं. गो. तुळपुळे, य. द. भावे ही मंडळीही त्यावेळी तिथे होती. असं हे साहित्यिक वर्तुळ त्या काळात होतं. कृ. ब. निकुंबांना भेटावं असं फार वाटत होतं. त्यांच्या बालकविता मला फार आवडतात. पण ते आजारी असल्याचे इंदिराबाईंनी सांगितले. त्यांची स्मृतीही गेलेली. ऐकून वाईट वाटले. नुकतेच ते वारले. बेळगावी जाऊनही त्यांची भेट घेता आली नाही याची चुटपुट मनात राहिली. 'पूर्वी मी १५ दिवसातून त्यांना भेटायला जात असे. तेही येत असत.' इंदिराबाईंनी सांगितलं.

मी इंदिराबाईंकडे गेले त्याच्या आदल्या दिवशीच कविवर्य वसंत बापट येऊन गेले होते. त्यांच्याविषयी इंदिराबाई बोलत राहिल्या.

इंदिराबाईंच्या बोलण्यात नाना विषय होते. इंदिराबाईंचे वडील गदगला मामलेदार होते. त्यावेळी त्या पाच वर्षांच्या होत्या. तेव्हा कर्नाटक नव्हतंच. मुंबई इलाखा म्हणत. 'मी अजूनही महाराष्ट्रात नाही आणि कर्नाटकातही नाही सीमा प्रश्नावर आहे.' इंदिराबाई हसून म्हणाल्या. 'ज्या अर्थी मी इतकीही वर्ष इथे राहिले. हे गाव आवडलं म्हणूनच राहिले. माणसं इथली चांगली. निसर्ग चांगला, हवा चांगली. आता इथलं सौंदर्य कमी झालय. इथले रस्ते लाल दिसायचे. अंगणं लाल दिसायची.' इंदिराबाई सांगत होत्या. आणि मी श्रोता होऊन ऐकत होते. सारस्वत लोकांची वस्ती इथे जास्त आहे. ते लोक थोडे राजेशाही. आणि श्रीमंत लोक फार रहात इथे त्यावेळेला. मला कानडी येतं, समजतं. बेळगावची भाषा यायला नको कां ! भाषेनं काय केलंय? पुणं आणि बेळगाव मला सारखंच! इंदिराबाईंच्या या बोलण्यासरशी दिलखुलास हसू आलं. नुकतंच मुंबईला झालेलं साहित्यसम्मेलन, कर्नाटक वाद यावर इंदिराबाई बोलत होत्या. सम्मेलनावरून त्यांना आठवण झाली ती ना. सी. फडके साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष होते तेव्हाची. 'ते मी पाहिलेलं पहिलं साहित्य सम्मेलन रत्नागिरीचं. तेव्हा फडक्यांचं आणि ताईचं (कमल) प्रेम जमलेलं माहित होतं. अप्पा फारसे कुणाकडे जात नसत.' ना. सी. फडके इंदिराबाईंचे मेहुणे. कमलबाईंचा आणि त्यांचा प्रेमविवाह झाला. विशेष म्हणजे हे दोघेही साहित्यिक आणि इंदिराबाई आणि ना. मा. संतही. संत अकाली गेले नाहीतर, त्यांच्या हातूनही खूप चांगलं काव्यलेखन झालं असतं. सहवास हा इंदिराबाई आणि ना. मा. संत यांचा संयुक्त कवितासंग्रह. सहवास या काव्यसंग्रहामुळेच इंदिराबाईंची कवयित्री म्हणून वाचकांना ओळख झाली. स्त्रीगीतांच्या वळणाने त्यातील सहज साध्या आणि उत्स्फूर्त अविष्काराच्या अंगाने इंदिराबाईंची या संग्रहातील सुरवातीची कविता घडलेली दिसते.

*'दिवसाच्या मनी चांदणे दाटले*
*मन भारावले तसे माझे.*
*सूर्योदयापूर्वी नभ कोंदाटते*
*आणिक हसते त्याच वेळी*
*तसेच हृदयी काहीसे दाटले*
*तरीही वाटले गोड काही'*

'सहवास' मधलं इंदिराबाईंचा अनुभूतीचं विश्व असं साधं. या कवितांत प्रेमभावनेवर

भर आहे. अवघी भाववृत्तीच निसर्गप्रतिमात साकारली आहे.

केवढा मोठा कालपट इंदिराबाईंच्या कवितेने पाहिला. इंदिराबाईंची कविता कुठल्याही संप्रदायाशी नातं सांगणारी नाही. मुळात ही सारी कविता सहजतेतून आलेली आहे. सात दशकं कविता लिहिणं आणि तीही सकस अशी. हे खूप मोठं संचित इंदिराबाईंनी मराठी साहित्याला दिलंय. भावाभिव्यक्तीचे वेगळे वळण शोधणे हा त्यांच्या कवितेचे सहजधर्म आहे. सहवास, शेला, मेंदी, मृगजळ, रंगबावरी, गर्भरेशीम, चित्कळा, वंशकुसुम आणि आता प्रकाशनाच्या मार्गावर असलेला संग्रह एवढी त्यांची काव्यसंपदा आणि साधना. मेंदी, रंगबावरी, शेला या त्यांच्या संग्रहांना राज्यपुरस्कार मिळाला. गर्भरेशीमला साहित्यअकादमीचा पुरस्कार मिळाला आणि अनंत काणेकर पुरस्कारही. कुसुमाग्रज प्रतिष्ठानचा 'जनस्थान' पुरस्कार हा त्यांना मिळालेला, सर्वोच्च पुरस्कार. त्यावेळी इंदिराबाई भारावून गेल्या होत्या. महाराष्ट्रातील या थोर कवीने आणि तोही मराठी कवीने दिलेला हा पुरस्कार महान आहे. यापुढे मला कोणत्याही पुरस्काराची अपेक्षा नाही. माझ्या कवितेचा हा सन्मान झाला. एका कवितेचा हा सन्मान आहे. कर्नाटकात राहून तो मला मिळाला हा सुद्धा एक बहुमानच म्हणावा लागेल' एका व्रतस्थ वृत्तीने काव्यसाधना करणाऱ्या ज्येष्ठ कवयित्रीचे हे उद्गार. इंदिराबाईंचे नाते मातीशी आहे.

*वर्षेतिल संध्येपरि आले मी आवरीत*
*रक्ताचा जाव्ळ लाल दुःखाची गडद लाट*
*वर्षेतिल रात्रीपरि आले मी सावरीत*
*नयनातिल अश्रु निळे हृदयातील वीज -*
*धगधगते जीवन हे धरून असे ओंजळीत*
*आले मी कुठून कशी... आले मी हेच फक्त*

'आले मी हेच फक्त' या आवर्तनात प्रदीर्घ अनुभव चिंतन आहे. कविता हे व्रत आहे. ते साऱ्यांनाच पेलवत नाही. त्याला जी आत्मसाधना लागते ती असिधारा व्रतासारखी असते. आणि हे व्रत इंदिराबाईंनी पाळून आपलं असं भावविश्व निर्मिलंय.

भावकाव्य हे स्वभावत:च वैयक्तिक अनुभवांची विशिष्टता शोधत जाणारं काव्य आहे. या अशा कवितांमधील भावनाशय हा सर्वस्वी कवीचाचा असतो. या भावकवितातून बहुतांशी इंदिराबाईंचा आणि निसर्गाचा अखंड संवाद चाललेला असतो. त्यांची कविता आणि निसर्ग यामधून निसर्ग असा वेगळा काढताच येत नाही. बाधा, मेंदी, मृण्मयी, शेला या कविता निसर्गप्रतिमा सृष्टी इतर कवींच्या कवितात क्वचित पहायला मिळते ह्या प्रतिमा कशा काय उमटत असतील इंदिराबाईंच्या काव्यात?

हे कुतूहल जाणून घेण्यासाठी गप्पांच्या ओघात मी त्यांना विचारलं. तेव्हा त्या म्हणाल्या 'ज्यावेळी ते लिहावसं वाटतं ना, ते मी सगळं त्याच्यामध्ये घेते. आपोआपच होतं ते. आणि जे येतं ते अटळपणे असं निसर्गातलंच येतं. त्यामुळे त्याची आता सवय झालीय. इतर प्रतिमा अशा माझ्या मनात सहसा येत नाहीतच. आणि कोणतीहो प्रतिमा जरी घेतली तरी माझं मन एकदम निसर्गाकडेच धावतं.'

इंदिराबाईंच्या काव्यात समर्थ निसर्गप्रतिमासृष्टी पहायला मिळते. 'ह्या प्रतिमा तुमच्या काव्यात कशा उमटतात?' इंदिराबाई म्हणाल्या, 'आपण नदीत जसे गोटे

. गोळा करतो, ना वहात येतात ते, ते शाळीग्राम आपल्याला माहीत आहेत. जसे ते प्रवाहाबरोबर झिजत, घडत, विशिष्ट आकार घेऊन वहात वहात येतात, तसे हे शाळीग्राम सापडतात. कुठेतरी आपोआप सापडतात. आता मी एक उदाहरण सांगते. निसर्ग मला आवडतो असं मी सांगितलं. पण तो आवडतो किती तर निसर्गाचा डोळ्यांशी फार संबध आहे. तो पहावा तेवढा थोडा आहे. मग हा निसर्ग किती पहावा आणि काय पहावा याला काहीतरी शब्द पाहिजेत. मी म्हटलं - जेव्हा फिरले डोळ्यांमधुनी हिरवे काजळ' 'हिरवे काजळ' असं मी का म्हटलं? आता तुम्ही म्हणाल, काजळ तर काळं, मग हिरवं काजळ का? तर मी काजळीचा काळा रंग काढूनच टाकला. काजळ फक्त ते लेण्यापुरतच लावलं, आणि हिरवं असं म्हटलं आणि 'हिरवं' असं का म्हटलं तर निसर्ग हा माझ्या इतक्या डोळ्यांजवळ आहे की जणू काही तो काजळ घातल्यासारखाच काठापापणीशी असतो. ही कल्पनाच मला अधिक आवडली. पण ती कशी आली हे सांगता येत नाही. पण हिरवे काजळ हे शब्दच एकदम आले आणि मग मी घालूनच टाकले. असंच सगळीकडे झालं आहे'

कवीच्या कलाविश्वात त्याच्या कलाचक्षूंना जाणवलेले रंग वैशिष्ट्यपूर्ण असतात. इंदिराबाई तुमच्या कवितेतील रंगवाचक विशेषणं पहाण्यासारखी आहेत. उदा. आभाळाचा निळा पारवा, नळी कुसुंबी, संध्या धूसर. किंवा तुमच्या कवितेतील रंग संदर्भी शब्दांचं वेडही मनस्वी आहे. 'सोनं' हा शब्द घेतला तर सोनहासरी, सोनवर्खी, सोनमखमली, सोनगौर असे शब्द येतात. किंवा तुमच्या कवितांमध्ये काही विशेषणातून अचेतनाला सचेतनसापेक्ष गुणविशेष लावून तुम्ही चैतन्य निर्माण करता. उदा. माती दुखरी; उन्ह गोमटे, सोनहासरी शेवंती वगैरे. हा शब्दांचा फुलोरा याबद्दल थोडं सांगा नं.'

'त्याचं असे आहे, रंगाची मला पहिल्यापासूनच अतिशय आवड आहे. ते आवडण्याचं कारण देखील निसर्गातील रंगच. दुसरी गोष्ट मला शब्दांची आवड निर्माण झाली ती स्त्री गीतांमुळे. एका स्त्रीगीतात वाई नवऱ्याला 'कांदापात' साडी पाहिजे म्हणते. म्हणजे कांदापात हिरवा रंग. हिरव्या रंगात देखील तिने कसा फरक केला पहा. अशा गोष्टी माझं मन लागलीच ओढून घेतात. आणि मग त्या रंगांना उचित असे शब्द अगदी अलगत येतात.'

*'ग्रीष्माची नाजूक टोपली*
*उदवावा कचभार तिच्यावर*
*जर्द विजेचा मत्त केवडा*
*तिरकस माळावा वेणीवर*

या 'मृण्मयी' मधल्या ओळी किंवा

*निळे तलम रेशीम,*
*काठावरी सूर्य फुले,*
*भरजरी पदरात*
*शुभ्र राजहंस खेळे*
*माझा आवडता रास्ता*
*जळधारी सोनसळी*
*अश्विनाची संध्याकाळ*
*झगमगे पदराला'*

अशी 'मीही लाडकी बहिण' मधल्या ओळी झरकन, नजरेसमोरून आल्यावाचून राहिल्या नाहीत.

बैठक छान जमली होती. गप्पा रंगल्या होत्या.



अनुक्रमणिका

इंदिराबाईंनी नुकतीच लिहिलेली एक कविता वाचून दाखवली.

*'गोठे भरले सुन्न उसासून*
*कुठे न भूपाळीची गुणगुण*
*लोण्यासाठी कुठे न घुसळण*
*शिंके हलता कुणा न ताडन*
*दिवस कसा हा घोर उदासीन*
*अक्रूराच्या क्रूर रथातून*
*कृष्ण निघाला गायी सोडून*
*अवघे गोकुळ धावे मागून*
*कृष्णकन्हैया...*
*काळवंडते निराश तनमन*
*उभी राधिका रथ अडवुनी*
*डोळ्यामधुनी घळघळ पाणी*
*श्यामसुंदरा आता तुजवीण*
*कसे ऐकू मी मुरलीवादन !*
*ती तर माझे पंचप्राण*
*रथामागुनी धावून धावून*
*पडली कितीदा राधा गवळण*
*चुडे पैंजणे तुटती छन छन*
*चिताक पुतळ्या पडती निखळून*
*धुरळ्यात चांदण्या उदासीन*

अक्का फारच छान जमलीय कविता! 'ज्ञानेश्वरांचे अभंग वाचतेय', पुस्तक वाचतेय. पुस्तकं आणून ठेवलीय. तर त्याच्यात कृष्णाला अक्रूर घेवून जातो. त्यावेळी स्थिती कशी झाली गोकुळात ! काय सुंदर प्रसंग आहे हा ! गोकुळ उदास झालंय. कृष्णाने गाई सोडून दिल्या तो रथाकडे जाऊ लागला. सगळे त्याच्यामागून धावू लागले. राधा म्हणते कृष्णाला, तू इथे नसलात तर मी मुरली कुणाची ऐकू? मुरली हे माझे पंचप्राण आहेत. राधाही गर्दीत त्यांच्यामागे धावत होती. तिचे पैंजण तुटले, गळ्यातले दागिने खाली पडले. लोक धावत होते. त्यामुळे धुरोळा उडत होता. त्या धुरोळ्याला मी आकाश असे समजते. चिताक् पुतळ्या हे दागिने त्यावेळचे. पुतळ्या मुद्दाम घातल्या. त्या म्हणजे जणू चांदण्यासारख्या दिसतात. चांदणे म्हणजे हे दागिन्यांचे विखुरलेले तुकडे अशी कल्पना केली' आपल्या कवितेचं असं सुंदर विश्लेषणही इंदिराबाईंनी केलेलं ऐकायला मिळालं.

आता संध्याकाळ व्हायला आली होती. गप्पा संपत नव्हत्या. गावातही थोडा फेरफटका मारायचा होता. चहापाणी होऊन इंदिराबाईंचा निरोप घेतला. त्या दारापर्यंत हळूहळू पोहचवायला आल्या. इंदिराबाईंची आणि माझी पहिली भेट ७३-७४ साली झाली. गेल्या पंचवीस वर्षांत कितीदा तरी त्यानंतर भेटी झाल्या. पण यावेळी मला त्या थकलेल्या जाणवल्या. वार्धक्य अंगात पुरं मुरलेल्या. निघताना त्यांनी हातात विश्वास पाटलांची महानायक ही कादंबरी भेट म्हणून ठेवली. हातात ती सांभाळतच मी फाटक बंद करून घेतलं. आता परत वेळगावी आलं तरच इंदिराबाईंची भेट होणार होती.

वडगाव रस्त्याने आम्ही निघालो. त्या ज्या ट्रेनिंग कॉलेजच्या प्राचार्य म्हणून निवृत्त झाल्या ते कॉलेज दुरून पाहिलं. वडगावात आता वरेचसे बंगले झाले आहेत. चालत चालत आम्ही वडगावहून पुढे रिक्षा केली. बेळगांव म्हणजे मागांचं गाव. मागासाठी जवळजवळ प्रत्येक घरात माग. गावात साधी घरे. रस्ते अरुंद. एक दोन घरात जाऊन मागावरचं काम पाहिलं. सुमारे तीन हजार माग तरी असतील वेळगावात. केवढी प्रचंड उलाढाल इथे चालते. तयार माल मुंबईखेरीज

अन्य ठिकाणी विक्रीला जातो असं जयश्रीताई म्हणाल्या. इथे शहापुरातही एक दोन ठिकाणी बेळगावी साड्या चांगल्या मिळतात, त्या म्हणाल्या. म्हणून रिक्षा करून गेलो. तिथे काही साड्या पाहिल्या. जिजामाता, नारायणपेठ, अशा साड्या आता सर्वत्र मिळतात. तिथून घरी आलो. तो भाग पहात पहात घराकडे निघालो. 'फार पूर्वी खानापूर कडून वडगांवकडे जाणारा रस्ता खाचखळग्यांचा दगडगोट्यांचा निर्जन होता. आता खूप बदल झालाय. बेळगावातच खूप बदल झालाय. वस्ती वाढलीय' जयश्रीताई रस्त्याने जाताना सांगत होत्या. तरीही मला बेळगाव पुण्यापेक्षा शांत, निसर्गरम्य वाटलं. एवढं मात्र खरं. आणि लाल मातीचे रस्ते मला फारच आवडतात.

*'लाल मऊ धुळीतील*
*उमटली खूण खूण*
*माझ्या अंतरीचा ठेवा*
*पहा गडे न्याहाळून'*

अशा सहज आरस्पानी इंदिराबाईंच्या काव्यपंक्ती सहजच आठवल्या. रस्त्याने जातानाही इंदिराबाईंच्या वरच आम्ही बोलत होतो.

इंदिराबाई कॉलेजच्या शिक्षणासाठी पुण्याला आल्या आणि फर्ग्युसनच्या वसतिगृहात राहू लागल्या. त्यावेळी फर्ग्युसनचं वातावरण किती रम्य होतं. कॅनॉलमधून पाणी सोडलेलं असायचं व आजूबाजूला दाट झाडी. रम्य वातावरण. कोणी आक्सफर्ड युनिव्हर्सिटीशी तुलना केलेली. कुणालाही काव्य करावसं वाटावं असाच कॉलेजचा परिसर. टेकडीच्या पायथ्याशी वसलेलं फर्ग्युसन. अशा वातावरणात इंदिराबाईंच्या काव्यवृत्ती बहरल्या तर नवल नाही. विशिष्ट घटनांमुळे त्यांचं काव्यरूप निश्चित झालं. इथेच त्यांची ना. मा. संताबरोबर ओळख झाली. त्याचं रूपांतर प्रेमात झालं. मोकळ्या वातावरणात कोंडलेल्या वृत्ती मोकळ्या झाल्या. कवितेला बहर येऊ लागला. तसं पाहिलं तर इंदिराबाई लहान वयातच कवितेकडे छंद म्हणून पाहू लागल्या होत्या. तवंदी, बेळगाव, इथला निसर्ग अवतीभवती होता. पुढे तर त्यांनी कथाही लिहिल्या. त्यांचं गद्यलेखनही सरस उमटलं. मृदगंध आणि फुलवेल मधलं आत्मकथनही भावोत्कट आहे. सुरुवातीच्या काळात लेखनासाठी कोणीच मार्गदर्शक नव्हता. बरेचदा वर्गात कविता रचून म्हटल्या. चौथीच्या मास्तरांना कवितेचा नाद होता. एकदा गुरुजींना समजलं त्यांनी कौतुक केलं.

*'चिमण्या बोल रे चिंवचिंव*
*तुझी वाटते कीव'*

कागदावर लिहिलेली ही पहिली कविता.

पुढे गोविंदाग्रज, बालकवी, कवी यशवंत, माधव जूलियन यांच्या कविता वाचनात आल्या. खऱ्या अर्थाने कविता लिहिली आणि काव्यलेखनास सुरूवात झाली ती कविता होती,

*'पराधीन करून गेला लाडक्या जीवाला*
*नाही काय ओळखले हो घातकी जगाला*
*वटारून डोळे कोणी पाहता नमावे*
*तीव्र बोल सोसून घ्यावे अंतरी झुरावे'*

विद्यार्थी दशेतली ही कविता. या कवितेतून इंदिराबाईंनी आपला अनुभवच व्यक्त केलाय. त्या लहान वयात असतानाच वडील वारले. दूरचे काका अतिशय तापट होते. ते सर्व देखभाल करत. केव्हा संतापतील

आणि ताडताड बोलतील याचा नेम नसे. हीच मनस्थिती या काव्यात उतरली आहे. म्हणजे मनातील भाव कवितेत उतरावे ही जाणीव इथे आलेली दिसते. मॅट्रिक झाल्यावर इंदिराबाईंनी एक कविता लिहिली. ती त्यांनी लिहिलेली पहिली प्रेमकविता.

*'जर तुमची माझी ओळख इतुकी नाही*
*तर ओढ मनाला सदा लागते का ही*
*कधि शब्द ऐकता तुमचा वाटे माते*
*हे प्राजक्ताचे फूलच खाली येते'*

पुढे ही कविता सहवास मध्ये समाविष्ट झालीय. फर्ग्युसनमधील रम्य वातावरणात इंदिराबाईंच्या काव्यवृत्तीला वहर आला. आज त्या काव्यातील ओळी सामान्य वाटत असल्या तरी त्या पहिल्यावहिल्या कवितांतून पुढची वाट वहरली. 'माळ', 'कोठे' यासारख्या त्यांच्या कविता अनुभूती वाटत होत्या.

*'केव्हापासून पाखरू घालीतसे गोड शिळ*
*कुठे बोलाविते मला'*

वसतिगृहाच्या खिडक्यासमोरच्या आंब्यावर बसून ठराविक वेळा घुमत राहणाऱ्या शुभ्र पारव्याचं चित्र या कवितेत उमटलंय. या वातावरणात कविता बहरत असतानाच इंटर झाल्यावर पुढील शिक्षणासाठी त्यांना कोल्हापूरला जावं लागलं. आणि बी.ए. ची परीक्षा त्यांनी कोल्हापूरहून दिली. ज्या दिवशी परीक्षा संपली त्याच दिवशी ना. मा. संतांबरोबर लग्न झालं. १९४०च्या सुमारास इंदिराबाई आणि ना. मा. संत यांचा सहवास हा पहिला कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. एकमेकांची ओळख ते संसारातल्या पहिल्या टप्प्यापर्यंत सहवासजन्य अनुभवांच्या ज्या अनेक छटांचा प्रत्यय आला त्यांची विविध रूपं त्यात आहेत. पण हा सहवास नियतीला

पहावला नाही. १९४६ मध्ये टायफाईडचं निमित्त होऊन ना. मा. संत मृत्यू पावले. अवघा अकरा वर्षाचा संसार आटोपला. पदरात सात वर्षाखालची तीन मुलं. शिक्षकाच्या नोकरीसाठी आवश्यक ती बीटी पदवीही नव्हती. नंतर इंदिराबाई बोर्डीला जाऊन दोन वर्षाचा कोर्स करून आल्या. आणि नंतर त्यांनी अध्यापनाचा व्यवसाय केला. पण एकाकी जीवनात सर्व आघाडीवर तोंड देताना त्यांच्याजवळ एकच विरंगुळा होता तो म्हणजे लेखन. आणि ती लेखणी आजपर्यंत खाली ठेवलेली नाही.

'जिद्द माझीही तशीच नाही लवलेली मान
जरी फाटला पदर तुझे घेलते मी दान
काळोखते भोवताली जीव येतो उन्मळून
तरी ओठातून नाही तुला शरण-शरण

इंदिराबाईंची ही जिद्दीची आत्मशक्ती अनेकदा त्यांच्या कवितेतून व्यक्त झालीय.

इंदिराबाईंच्या जीवनाचा केवढा मोठा पटच समोर आला. एव्हाना आम्ही ठळकवाडीच्या रस्त्याला लागलो. तेव्हा रात्र झाली होती. हवेत सुखद गारवा होता. इंदिराबाईंच्या भेटीने मन प्रसन्न झालेले होतं.

दुसऱ्या दिवशी दिवसभर साहित्य संमेलन छान पार पडलं. अनेक नवीन ओळखी झाल्या. वैचारिक देवाण घेवाण झाली. परिसंवाद, काव्यवाचन, साने गुरुजींच्या साहित्यावर बसवलेला कार्यक्रम, एकपात्री रमाबाईंचा बसवलेला कार्यक्रम असे सर्वच कार्यक्रम उत्तम पार पडले. दोन दिवस देशपांडे दांपत्याचं प्रेमळ अगत्य. इंदिराबाईंची भेट. बेळगावातून निघताना मन कसं भरलेलं होतं. आता परतीचा प्रवास.

बेळगाव कोल्हापूर हमरस्त्यावर जो तवंदीचा घाट लागतो त्या तवंदीच्या माथ्यावर तवंदी हे छोटंसं खेडं वसलंय. हे इंदिराबाईंच्या वडिलांचं इनाम गाव. तिथले हे इनामदार - दीक्षित. गाव हजार दोन हजार वस्तीचं. सह्याद्रीच्या ज्या डोंगररांगा त्यापैकी एकावर तवंदी वसलंय. डोंगराच्या पठारावर खेड आणि शिवार आणि पायथ्याशी ब्रह्माचे देऊळ आहे. दगडी बांधकामाचे, प्राचीन, चारी बाजूंनी मोठ्या मोठ्या ओवऱ्या आणि मधे मोठे देऊळ अशी रचना आहे. एका भागात जैन तीर्थकरांच्या मूर्ती आहेत. मूर्ती मोठ्या सुरेख आहेत. आवारात सर्वत्र स्वच्छता. देवळात स्वच्छता. हे अगदी लक्षात राहिलं. केवढं सुंदर काम करून ठेवलंय या लोकांनी. जवळच पाठशालाही आहे. एका बाजूला डोंगराची उतरण आणि दुसऱ्या बाजूला सपाट अशी शेत जमीन. डोंगराच्या उतरणीला खोल दरी. जैनांचे देवस्थान जिथे आहे तिथेही दाट झाडी आहेच. हा परिसरच अतिशय रम्य आहे. डोंगराच्या तिन्ही बाजूंनी वळणावळणाचा रस्ता आहे. यालाच तवंदीचा घाट म्हणतात. तवंदीमध्ये दोन तीन घरे ब्राह्मणांची. दीक्षित इनामदाराचा वाडा होता. ह्या चिमुकल्या तवंदी (स्तवनिधी) गावात इंदिराबाईंचा जन्म झाला. वडील मामलेदार त्यामुळे बदल्या होत. इंदिराबाईंचं बालपण इथेच गेलं. इनामदारांचा वाडा दुमजली होता. ऐसपैस अंगण होतं. वर दोन प्रशस्त माड्या होत्या. गाव डोंगरावर असल्याने हवेशीर. गावातून वहाणाऱ्या नदीचे नाव हिरण्यकेशी. या वाड्याच्या वरच्या मजल्यावरून हिरण्यकेशीचा पूल दिसायचा. आणि दूरवरचे घनदाट जंगलही. गावात एक विहीर. अर्धा डोंगर उतरून गेल्यावर ही विहीर. एक पाणद.

दोन्ही बाजूला बाभळी, चिंच, अडुळसा. करवंदी, शतरंग, घाणेरी, घंटीच्या फुलांच्या कुंपणाच्या दोन्ही बाजूला हिरवी भिंत उभी करणाऱ्या वेली होत्या. करवंदीच्या जाळ्या होत्या. कुलदेवता कोल्हापूरची अंबाबाई. वडलांचे दैवत दत्त. त्यांनी तवंदीला विहीर बांधली. गुरांसाठी पाण्याची व्यवस्था केली. लक्ष्मीचं मोठं देउळ बांधलं. रस्ता केला.

बालपणातल्या कितीतरी आठवणी इंदिराबाईंनी मृद्गंधमध्ये सांगितलेल्या आहेत. दिवाळीत मातीची खेळणी करायची. भेंडाची बैलगाडी करायची. नागपंचमीला मातीचा नाग करायचा. नागीण, तिची पिलं करायची आणि हे सारं गोठ्यात ठेवायचं. गोठ्याला त्यांनी आर्टगॅलरी म्हटलंय. किती छान कल्पना. गोठ्यात १५-२० गाई गुरं. झुंजूमुंजू झालं की ओवीचे स्वर कानावर पडत. या गुरांना कडबा घालायचा. या जनजीवनात त्या पूर्णपणे मिसळून गेल्या होत्या. हाताला खडकाळ चढ होता. त्यावर खूप निवडुंग होते आणि पांढरीलाल घाणेरीची झाडे. ओचात घेऊन जायचे आणि त्याचे दागिने करायचे. इंदिराबाई म्हणतात, 'या सगळ्या उद्योगांनी मला एक मोठा नजराणा दिला. निसर्गमाळ परिसरातील लावण्ये नि तपशील यांची गोडी लागली. या सर्व तपशीलातील सूक्ष्म असे काहीतरी माझ्या कवितेत तिच्या शक्तीप्रमाणे मिसळलं आहे' तवंदी ही जणू जिवंत व्यक्तिरेषा वाटावी असं वर्णन इंदिराबाईंनी मृद्गंधमध्ये केलंय.

*'निवडुंगाच्या जीर्ण फुलांचे*
*झुबे लालसर ल्यावे कानी'*

हे बाळपण असं कवितेतही झरलेलं.

इंदिराबाईंचे वडील गदगला वारले त्यावेळी त्या सात वर्षांच्या होत्या. मग त्या आईबरोबर दोन वर्ष तवंदीला येऊन राहिल्या. पुढे मग शिक्षणाच्या निमित्ताने बेळगाव. पुणं - कोल्हापूर असं रहाणं झालं तरी सुटीत तवंदीला जाणं होई. तवंदीचं आकर्षण होतं. निसर्ग हा सुद्धा त्यांच्या भावसृष्टीचा एक अविभाज्य घटक आहे. त्यातूनच त्यांची संपन्न प्रतिमासृष्टी निर्माण झाली. तवंदीमध्येच त्यांना वाचनाची आवड निर्माण झाली. रामायण, महाभारत हे ग्रंथ घरात होते. बरोबरीचे खेळणारे कोणी नसल्याने वाचनाचा नाद लागला. वडलांना वाचनाचा नाद होता. घरात भारतगौरव ग्रंथमालेच्या कादंबऱ्या होत्या. मनोरंजनचे अंक येत होते. रात्री मोरोपंत, वामन पंडित यांची आख्याने मोठ्याने वाचायची वडलांना संवय होती. त्या आर्या इंदिराबाईंना खूप आवडत, पण वडील वारले आणि तवंदीचं त्यांचं भावविश्वच बदललं.

पुढे गांधीवधाच्या वेळी जे जळीत झालं त्यात कोल्हापूरच्या लोकांनी हा इनामदारांचा वाडा जाळला. आगीच्या भक्ष्यस्थानी पडला. आणि उरले दगड विटांचे ढीग आणि मनभर आठवणी. कधी एकदा त्यानंतर इंदिराबाई तवंदीला एकदाच गेल्या त्याचं वर्णन त्यांनी केलंय —

*'जिच्या पंखाखाली वाढले*
*तिच्या ओटीने कित्येक वर्षात आज*
*येथवर आले.... ती ही वास्तू.*
*सत्तेचाळीसच्या वणव्यातील एक आहुती*
*ती ही वास्तू...*
*विद्रूप उघड्या भिंती कोसळलेले ढिगारे*
*पण मला हे काही दिसत नाही. मला दिसते...*
*हे स्वयंपाकघर*










*जिथे आईने भरभरून पाने वाढून दिली*
*आणि भरभरून आशीर्वाद घेतले*
*हे देवघर*
*ज्याने मला प्रार्थना शिकवली 'ये लक्ष्मी बैस ग बाजे माझे घर साजे'*
*हे माजघर*
*जिथे मी ऐकले पित्याच्या मुखातून*
*मोरोपंतांचे महाभारत'*

या साऱ्या आठवणीने त्या गलवलून जातात. त्यांची एकेकाळची स्वप्नभूमी म्हणजे तवंदी. पण त्यांच्या घराची अशी धूळधाण झालेली त्यामुळे व्यथित होतात. परसदारातलं तुळशीवृंदावन पाहून त्यांचं मन भूतकाळात जाऊन पोहोचलं. एकेकाळी तिन्ही सांजेला तुळशीपाशी सांजवात व्हायची. आजही ते तुळशीवृंदावन धनिणीची वाट पहातंय.

धनीण येईल, हळदीकुंकू वाहील, चांदीच्या झारीने पाणी शिंपील, कौतुकभरल्या पायांनी प्रदक्षणा घालील.

निदान तिन्ही सांजेल पणती लावून जाईल. त्याची समजूत घालताना आभाळही हरले आहे.

इंदिराबाईंना वाटतं. गावे आपली उरली नसतील, पण जी माणसे, जो निसर्ग स्नेहभावाने आपल्याशी बांधला गेलाय त्याच्यासाठी तरी तिथे जायला हवे. इथला निसर्ग म्हणजे केवळ तवंदीलाच नव्हे तर पुढेही जन्मभर इंदिराबाईंचा जीवलग सहचर झाला. आयुष्यात अनेक सुखदु:खाचे प्रसंग आले पण निसर्गाची आणि त्यांची साथ तुटली नाही. विविध प्रकारे तो त्यांच्याभोवती वावरत राहिला. त्यांना खुणावत राहिला, मग बोर्डीला शिकत असताना लाटालाटांनी उसळत किनाऱ्यापाशी पसरणारा समुद्र, तिथलं सुरूचं बन, पुण्यातलं उदाचं बन, बेळगावची लाल माती, पाऊस. घराच्या भिंतींवर उगवणारे लाल फुलांचे तुरे, निसर्ग असा किती रूपाने भेटतो. त्यांच्या कवितांतून! अनेक कवितातून त्यांच्या भाववृत्ती निसर्गप्रतिमांच्या द्वारा व्यक्त झाल्या आहेत. त्यांची कविता म्हणजे त्यांच्या काव्यात्म मनाने विशिष्ट भावस्थितीत निसर्गाशी केलेला संवाद असतो असं ज्येष्ठ समीक्षक वा. ल. कुलकर्णी यांनी म्हटलयं. ते सार्थ आहे.

तवंदीचा परिसर मलाही खूप आवडलेला. इंदिराबाईंच हे गाव हे नंतर समजलेलं. हा परिसर मी काही वर्षांपूर्वी पाहिलेला. गाडीत बसल्या बसल्या या अशा कितीतरी आठवणी येत होत्या. तवंदीच्या, बेळगावच्या. हो आता बेळगावची इंदिराबाईंची भेटही आठवणीतील होऊन राहणार होती.

किती उंचावरून पानाफांद्यामधून आकाशातून.... बकुळीचे हे ओघळणे - किती लडिवाळ - लोभसवाणे !

झुंझुकमुंझुक वाऱ्याच्या अलवार लयीवर
हिचे हळुवार हिनकळणे - की कुणाच्या मनोमनीचे मंद्रसुवासी सरगमणे...

ह्या बकुळीच्या फुलासारखीच मंदसुवासी लयवेल्हाळ इंदिराबाईंची कविता. बकुळीच्या फुलांचा मंद सुवास मनाला मोहित करतो. इंदिराबाईंची कविताही बकुळीच्या फुलांसारखीच आहे. आपली स्वतंत्र सुवासिक भावमुद्रा उमटवणारी.

□

डॉ. मंदा खांडगे
२४, ऋणानुबंध सोसायटी,
औंध, पुणे ४११ ००७.

अनुक्रमणिका

# पदव्युत्तर पातळीवरील मराठीचे अध्यापन

डॉ. र. ना. वरखेडे

**१. विद्याशाखानिष्ठ दृष्टिकोण :**

सृष्टिविज्ञान किंवा सामाजिक शास्त्रांहून स्वतंत्र अशा मानव्यविद्याशाखेत भाषा, कला, साहित्य, इतिहास आणि तत्त्वज्ञानाच्या अध्ययन-अध्यापनाचा समावेश होतो. व्यक्तीला तांत्रिक वा प्रशिक्षणात्मक कौशल्यांचे शिक्षण देण्यापेक्षा त्याच्यातील मानसिक, नैतिक व कलात्मक क्षमतांच्या विकासावर भर देणारी ही विद्याशाखा आहे. निसर्गदत्त सत्यापेक्षा मानवी सत्ये, मानवी मूल्ये, मानवाचा सर्जनशील अनुभव, त्याच्या अंत:शक्ती, निसर्गाशी व अन्य माणसांशी असलेला परस्पर संबंधांच्या शक्यता याविषयी आस्था बाळगणारी ही विद्याशाखा आहे. अन्य प्राणिमात्रांपेक्षा कोणत्या कारणांनी मनुष्यत्व वेगळे आहे, याचा विचार करणारी, म्हणजे प्रकृतीपेक्षा 'संस्कृती'चा रहस्यभेद करणारी ही विद्याशाखा आहे. थोडक्यात, माणसाच्या 'मानवत्वाचा', त्याच्या बौद्धिक आणि कलात्मक सर्जनशीलतेचा, मूल्यात्मक वर्तनविशेषांचा, सामूहिक जीवनसरणीचा संस्कृती निर्माणात जो वाटा आहे, त्याला अभ्यासविषय बनविणारी ही विद्याशाखा आहे. मुद्रणपूर्व काळातील प्राचीन हस्तलिखिते, अभिजात वाङ्मय, मौखिक वाङ्मय परंपरा, संगीत, नृत्य, चित्र, शिल्प, वास्तूकलांच्या परंपरा, नीतिशास्त्र आणि तत्त्वज्ञानाच्या परंपरा आणि या सगळ्यांतून प्रकटणारे मानवी मूल्यांचे आणि सांस्कृतिक जडणघडणीचे अंत:स्रोत तपासणे ही मानव्यविद्याशाखांतर्गत अभ्यासविषयांची सर्वसाधारण व्याप्ती आहे. पदव्युत्तर मराठीचे अध्यापन मानव्यविद्यांच्या या व्यापक परिप्रेक्ष्यातून व्हावे, हे ओघानेच येते.

मराठीचा भाषा-व्यवहार आणि मराठीतील वाङ्मयीन परंपरा यांना ज्ञानविषय बनवून मराठी भाषक समाजाच्या संस्कृतीचा, महाराष्ट्र संस्कृतीचा अभ्यास करणे ही मराठीच्या अभ्यासाची एक बृहत दिशा असेल. कारण संस्कृती ही पूर्ण व एकात्म असते. संस्कृतीच्या कोठल्याही एका उपांगाचे अध्ययन करावयाचे झाल्यास इतर उपांगांचाही विचार करावा लागतो. ज्याला आपण 'मराठी समाज' म्हणतो. त्या समाजाच्या विविध गटांच्या भाषा-व्यवहाराचा व वाङ्मयीन आविष्कारांचा शोध घेणे, त्यातील सांस्कृतिक अंत:प्रवाहांचे व्यवस्थापन करणे, त्यातील परस्परसंबंधांचा अन्वयार्थ लावणे, त्यांच्या अभिव्यक्तीतील घाटांचा त्यांच्या जीवनसरणीशी आणि मूल्यकल्पनांशी असलेला अनुबंध उलगडणे, नैसर्गिक व राजकीय बदलांचा या सांस्कृतिक घाटांवरील प्रभाव व परिणामांचा अंदाज बांधणे व या सर्वांतून ध्वनित होणाऱ्या मराठी संस्कृतीच्या विशेषांचा समग्र बोध करून घेण्याची तितिक्षा बाळगणे हे मराठीच्या पदव्युत्तर अध्यापनाचे व्यापक उद्दिष्ट असेल आणि तीच या अभ्यासविषयाची व्याप्तीही असेल.

अभ्यास विषयाच्या ह्या बृहत वर्तुळात एकेका उपांगाची अनेक अंतवर्तुळे नांदू शकतील. 'ललित साहित्याचा अभ्यास' हे या बृहत वर्तुळातील एक अंतवर्तुळ असेल. केवळ अभिजनांच्या मुद्रित साहित्याच्या अभ्यासातून मराठी संस्कृतीचा अभ्यास होणार नाही आणि ते संपूर्ण मराठी समाजाचे पुरेसे प्रतिनिधित्व करू शकेल असेही नाही. असाक्षर समाजगटातील सांस्कृतिक संचित त्यांच्या मौखिक वाङ्मयीन परंपरेद्वारे संक्रांत होत असते. त्यांच्या लोककथांमधून त्या त्या समाजगटाच्या रीतिरिवाजांचे, नीतिकल्पनांचे, मूल्यशिक्षणाचे, समाजातील परस्परसंबंधांचे, धर्माचे आणि शासनाचे संकेत रुजलेले असतात. असाक्षर समाजातील लोककथा, लोकगीते, लोकनाट्य, लोकचित्रकला यांतून त्या त्या समाजाच्या समाजधारणेचा अंदाज बांधता येतो. कारण असाक्षर समाजातील संस्कृतीला स्थैर्य देणारे आणि सांस्कृतिक परंपरांचे सातत्य टिकवणारे ते घटक आहेत. लोकाचार आणि ही अभिव्यक्ती साधने ह्यातला एकजिनसीपणा इथे लक्षात घेतला पाहिजे. पुत्रजन्माचा आनंद, लग्नविधीने परस्परांशी बांधले जाण्याचा प्रसंग, मीलनाचा अथवा विरहाचा अनुभव, दीक्षाविधीचा वा अंत्ययात्रेचा प्रसंग या सगळ्या आचारांचा लोकगीते, लोकनाट्ये हा एक अंगभूत भाग असतो. आनंद, शोक, क्षोभ, उपरोध-उपहास, विनोद, प्रियाराधन, वात्सल्य या सगळया भावाभिव्यक्तींचे माध्यम म्हणून गीत, नृत्य, कथा, नाट्य यांचा आश्रय करणारा समाज एकसंघ राहिला तो या अभिव्यक्तीच्या सातत्यशील परंपरांमुळेच. महाराष्ट्रातील या असाक्षर समाजाच्या संस्कृतीचा मागोवा घेण्यासाठी मराठीच्या पदव्युत्तर अध्यापनात ह्या संस्कृती-वैशिष्ट्यांचा ऊहापोह होण्याची आवश्यकता आहे.

समाजभाषाविज्ञानातून विविध बोली बोलणाऱ्या मराठी समाजाच्या विविध गटांच्या भाषिक वर्तनाचा अभ्यास करता येईल. शब्द हे संस्कृतीचे वहन करणारे माध्यम आहे. म्हणून भाषेचा अभ्यास म्हणजे ती भाषा बोलणाऱ्या समाजाचा अभ्यास हे सूत्र ठेवून वऱ्हाडी, खानदेशी, कोकणी, माणदेशी इत्यादी क्षेत्रविशिष्ट मराठी माणसाचा, भिल्ल, कोरकू, वारली, कातकरी अशा आदिवासी जनसमूहांचा भाषिक व वाङ्मयीन आविष्कार हे पदव्युत्तर मराठीच्या अभ्यासाचे एक महत्त्वाचे अंतवर्तूळ असेल. समाजभाषाविज्ञान व लोकसाहित्याच्या अध्यापनात विविध समाजगटात विभागल्या गेलेल्या मराठी भाषक समाजाच्या विविधतेचा आणि एकतेचा शोध घेणे आणि महाराष्ट्र संस्कृतीच्या विविध अंत:स्रोतांचे व्यवस्थापन करणे अभिप्रेत आहे. याच भूमिकेतून मराठी समाजाच्या लोकपरंपरातून आलेल्या व पुढे लिखित संहितारूप प्राप्त झालेल्या मध्ययुगीन साहित्यातील लौकिक परंपरांचे विविध वाङ्मयीन आकृतिबंध, त्यांचे प्रेरणास्रोत, या पाठीमागील जनांचे तत्त्वज्ञान आणि अभिजनांच्या तत्त्वज्ञानाशी असलेला परस्पर संबंध, सामाजिक अभिसरणाची प्रक्रिया आणि वाङ्मयीन घाटांची तंत्रे यांच्या अभ्यासातून महाराष्ट्रातील बहुजनांच्या व अभिजनांच्या सांस्कृतिक सलगतेचा आणि विविधतेचा शोध घेण्याची जबाबदारी पदव्युत्तर अध्ययन-अध्यापनप्रक्रियेत अंतर्भूत आहे.

साहित्याच्या अध्यापनासंबंधी मूलगामी चर्चा करणाऱ्या प्रा. वा. ल. कुलकर्णी गौरवग्रंथात प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या भूमिकेचा तपशील प्रा. सुधीर रसाळ यांनी नोंदविला आहे, त्याची येथे आठवण होणे स्वाभाविक आहे. प्रा. कुलकर्णी यांनी मराठवाडा विद्यापीठात रुजू झाल्यानंतर

अभ्यासक्रमात, अध्यापनाच्या उद्दिष्टांत आणि मूल्यमापनात बदल करायला सुरुवात केली. त्यातला पहिला बदल म्हणजे 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' हा अभ्यासक्रम त्यांनी एम. ए.च्या शिक्षणक्रमातून काढून टाकला. तसेच 'लावणी वाङ्मयात तत्कालीन समाजाचे पडलेले प्रतिबिंब', 'महानुभवांच्या द्वैती तत्त्वज्ञानाचे स्वरूप' या प्रकारच्या प्रश्नांची त्यांनी मराठवाडा विद्यापीठातून हाकालपट्टी केली. मराठीचा अभ्यासक्रम हा केवळ ललित वाङ्मयाचा अभ्यास करणारा असावा अशी भूमिका त्यांनी घेतली होती. त्यापाठीमागे त्यांचा कलावादी दृष्टीकोण होता. 'लेखकाचा वैयक्तिक अनुभव हा त्यातील स्थलकालसंबद्ध वैयक्तिकतेला नष्ट केल्यावरच वैश्विक बनतो' अशी साहित्यशास्त्रीय समजूतही या भूमिकेमागे होती.[१] डब्ल्यू. पी. केर यांचे एक विचारसूत्रही या अनुषंगाने लक्षात येते - We need not literary history as its objects are always present, are eternal and thus have no proper History at all.' मात्र अशा भूमिकेमुळे साहित्याचा अभ्यास मानव्यविद्यांच्या अभ्यासाच्या व्यापक उद्दिष्टांपासून दूर जातो हे येथे लक्षात घेतले पाहिजे. उलट कवी इतर लोकांपेक्षा आपल्या कालाशी आणि तत्कालीन मानवजातीच्या जाणिवेशी अधिक निकटचा व जिवंत स्पर्श साधीत असतो. त्याची कलावंत म्हणून ओळख ही त्याच्या साहित्यातील केवळ शैली-तंत्रांनी होत नसते तर स्थलकालसंबद्ध अनुभवाशी सूक्ष्म पातळीवर संबंध साधून त्या अनुभवांच्या सारतत्त्वांचा आशय संघटित करण्याच्या त्याच्या कौशल्यात असते. दलित साहित्य, ग्रामीण साहित्य, प्रादेशिक साहित्य असे आपण वर्गीकरण करतो किंवा मध्ययुगीन साहित्य, आधुनिक साहित्य असे कालनिष्ठ वर्गीकरण करतो तेव्हा त्या त्या साहित्यातील स्थलकालसंबद्ध आशयाचा आणि घाटांचाच आधार घेतो. वा. ब. पटवर्धन यांनी काव्याचा उदय परिस्थितीसापेक्षच असतो अशी भूमिका मांडली होती, ती इथे लक्षात घ्यायला हवी. त्यांनी भौतिक, मानवी आणि राजकीय परिस्थिती ही काव्योदयाची तीन कारणे सांगितली होती.[२]

एखाद्या युगात काही प्रमुख विचारांचे आकृतिबंध असतात, ते संपूर्ण समाजाच्या चिंतनशीलतेला प्रभावित करतात. उदाहरणार्थ, टिळकयुगात 'देश म्हणजे राष्ट्र' ह्या समजुतीचा प्रभाव होता, गांधीयुगात 'देश म्हणजे राष्ट्र आणि समाज' अशी समजूत रुजत होती तर नंतरच्या कालखंडात आंबेडकरांच्या वैचारिक प्रभावातून 'देश म्हणजे समाज' या समजुतीचा प्रभाव वाढलेला दिसतो. उदाहरणादाखल पहायचे झाल्यास विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील वाङ्मयीन आविष्कारातला गर्भित आशय (टिळक युगात) राष्ट्रीय जाणिवांना प्राधान्य देतो. शि. म. परांजपे पशुंच्या लोकसत्ताक राज्याच्या रूपकातून किंवा कृ. प्र. खाडिलकर कीचकवधाच्या पौराणिक रूपकातून इंग्रजी राजवट आणि भारतीयांची स्वातंत्र्याकांक्षा यांचा आशय वाङ्मयबद्ध करतात, तेव्हा त्यांच्यावर टिळकांच्या 'देश म्हणजे राष्ट्र' अशा राजकीय व राष्ट्रवादी जाणिवांचा प्रभाव असतो. गांधीयुगात ह्या प्रभावाचे स्वरूप बदलते. केवळ राजकीय स्वातंत्र्याच्या प्रश्नाऐवजी सामाजिक एकोप्याच्या प्रश्नालाही समान महत्त्व प्राप्त होते. साने गुरुजींच्या आस्तिक कादंबरीत नाग आणि आर्यांच्या संघर्षाच्या रूपकाला हिंदू-मुस्लिम ऐक्याच्या गांधींच्या भूमिकेची पार्श्वभूमी असते किंवा वि. स. खांडेकरांच्या कादंबऱ्यांतील



अनुक्रमणिका

इथे आग्रहाने मांडावासा वाटतो. उदाहरणार्थ, 'लीळाचरित्रा'सारखा ग्रंथ हा तत्कालीन सांस्कृतिक घडामोडीतला भागीदार असतो. महानुभावांचे तत्त्वज्ञान, त्यांचा आचारधर्म, त्यांची उपासनापद्धती, गुरु-शिष्य परंपरा, मठादी संस्था, प्रचलित राजसत्ता आणि धर्मकारणात पंथाने घेतलेली भूमिका, समकालीन समाजाचा पंथियांकडे पाहण्याचा दृष्टीकोण, हा सगळा स्थलकालविशिष्ट जीवनानुभव, त्यावेळच्या हाडामासाच्या माणसांच्या अनुभवाचा आशय थेटपणाने देणारा ग्रंथ आहे. मराठीच्या विद्यार्थ्यांना म्युझियममध्ये फेरफटका मारावा तसे इथल्या माणसांचे पोषाख, भांडी-कुंडी, खाणे-पिणे, त्यांची घरे, त्यांची प्रार्थनास्थळे, त्यांची भाषा यांकडे पहावयाचे, की एका विशिष्ट तत्त्वज्ञानाला अंगिकारणाऱ्या मानवी समूहाच्या दैनंदिन वास्तवाचा आणि अध्यात्मिक अनुभवांचा तळ यांचा समग्र वेध घ्यायचा? यादवकालीन समाजातील सांस्कृतिक नेणिवेचा मूर्त आविष्कार म्हणून अशा ग्रंथांचा समग्रतेने अभ्यास झाला पाहिजे. केवळ भाषिक संरचना, लीळांचा संरचनात्मक घाट यांची चिकित्सा करावयाची आणि या महानुभावांच्या विशिष्ट विचारप्रणालीला नेपथ्यासारखी मानावयाचे हे योग्य होणार नाही. कारण हे वाङ्मयीन घाट किंवा निरुपणपद्धती हे त्या पंथाच्या तत्त्वज्ञानातून, पंथीय कार्यपद्धतीतून आणि संप्रेषणाच्या सामाजिक गरजेतून निर्माण झालेले असतात. महानुभावांच्या वाङ्मयीन घाटांविषयीची लक्ष्मण रत्नाकरातली बत्तीस लक्षणी टीप या संदर्भात पुरेसी बोलकी आहे. : 'जेथ गोष्टी, मात, कथा, वार्ता, आख्यायिका, ते **लीळा**वाक्य बोलिजे : अज्ञान निवृत्तीलागी की संदेह निवृत्तीलागी तो वृत्तांतु सांगिजे ते **गोष्टि** : यथा कामाख्या निमित्ते पुरत्यागु : आश्चर्यकारक जे गोष्टी भविष्यरूप ते **मात** बोलिजे : एवं आदि द्वापाराचिया अथवा आपुल्या मागिलिया एकांकाचिया लीळा सांघितलिया तिया **कथा** : भक्ताला विद्यमान जे वर्तले त्या **वार्ता** : पुराण व्यतिरिक्त कथारूप गोष्टि ते **आख्यायिका**'

आधुनिक वाङ्मयातही कादंवरीसारख्या वाङ्मय प्रकारात लेखक आपल्या प्रतिभेने कल्पितसृष्टी निर्माण करीत असला तरी त्यातली पात्रे एका विशिष्ट समाजस्थितीचे प्रतिनिधित्व करीत असतात. पेंडशांच्या कादंवरीतला कोकण, माडगूळकरांच्या कादंवरीतला माणदेश, नेमाड्यांच्या कादंबरीतला खानदेश आणि मराठवाडा यातून जो स्थळकालविशिष्ट अनुभव येतो, तो साधारणीकृत होऊन अवतरत असला तरी त्याची स्थलकालविशिष्टता पुसून तो अस्तित्वात येतो असे होत नाही. म्हणून वाङ्मयाच्या अध्यापकाची भूमिका ही वाङ्मयाच्या माध्यमातून व्यक्त होणाऱ्या या स्थलकालविशिष्ट मानवी अनुभवसृष्टीचे समग्र आकलन करण्यासाठी विद्यार्थ्याला अध्ययनशील बनविण्याची असली पाहिजे. कवितेला इतिहास नाही (रूपवादी), मानवाचा इतिहास हा नुसता पाठीमागचा पडदा, कवितेला वेगळा इतिहास नसतो, मानवाचा इतिहास हाच कवितेचा इतिहास (आशयवादी), समाजाच्या सांस्कृतिक कोशातच काव्यव्यवहार चालतो. त्यात कवितेच्या माध्यमाला काळानुरूप कोणकोणती रूपे घ्यावी लागतील, त्याचा इतिहास म्हणजे काव्याचा इतिहास (आशय-रूपवादी) या तीन भूमिकांपैकी तिसरी आशय-रूपवादी भूमिका यादृष्टीने अधिक यथार्थ वाटते. आशय-रूपवादी भूमिकेतून वाङ्मयेतिहासाकडे नजर टाकली तर भक्तीसमतेचा आशय असलेल्या संतवाङ्मयाने ओवी-अभंगादी लोकछंदांना

अनुसरलेले दिसते, प्रौढ भक्तिवेदांत सांगणाऱ्या पंडितां कान्दाला प्रकरणे-आख्यानकाव्यांचे घाट किंवा अक्षरगणवृत्तादी अलंकारांना प्राधान्य देणारी प्रौढ शैली जवळची वाटली आहे. केशवसुत-तांबे या मध्यमवर्गीय कवींना आपल्या मध्यमवर्गीय जाणिवांचे आविष्कार करण्यासाठी मध्यमस्थानीय मात्रावृत्तेच जवळची वाटतात आणि विघटित व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार करणाऱ्या नवकवींबाबत छंदोमुक्ती अटळ ठरते.[५] आशय-रूपबंधांचीही परस्पर सन्मुखता लक्षात घेऊनच वाङ्मयाचे अध्यापन होणे इष्ट ठरेल. पदव्युत्तर अध्यापनात विषयाच्या विवक्षित कक्षेचे भान निर्माण करणे ही अध्यापकाची जबाबदारी असते. त्यामुळे वाङ्मयीन संहितेच्या आकलनात केवळ रूपनिर्मितीच्या घटकांच्या वा शैलीतंत्रांच्या अभ्यासाचा दबाव असता कामा नये, त्याचबरोबर वाङ्मयकृती म्हणजे त्या त्या काळातील समाज-वास्तवाच्या माहितीचा दस्तऐवज, इतकी मर्यादित समज रुजविणेही योग्य नव्हे.

साहित्यकृतीतील आशयांची संरचना, माहिती (facts/information). संबोध (concepts), तत्त्वे (principles), उपपत्ती (theories). उपकरणे (प्रतिमा-प्रतिके, दृष्टांत, उपमाने, निरुपणशैली इ. instruments) यांच्या आधारे उकलून पाहण्याची एक विद्यापद्धतीनिष्ठ रीत निर्माण करणे हे पदव्युत्तर अध्यापनातील एक मोठे आव्हान आहे. साहित्य ही एक सामाजिक संस्था आहे आणि साहित्यकृती हे एक सामाजिक घटित आहे या गृहिततत्त्वावर श्रद्धा असण्याचीही निकड आहे. तसे झाले तर साहित्यकृतींची रचनानुसारी आणि आशयानुसारी अभ्यासाची भेदमूलक मांडणी मागे पडेल व आशयरूपाची एकात्मता लक्षात घेऊन साहित्यातील मानवी आशय हा संस्कृती-प्रवाहाला एक अपरिहार्य टप्पा कसा ठरतो, याकडे पाहण्याची एक निकोप परंपरा निर्माण होईल. तसे झाले तर बनगरवाडीच्या कारभाऱ्याच्या मृत्यूच्या घटनेमागील भारतीय मनाची पारमार्थिकता त्याला उमजेल आणि भारतीय वाङ्मयीन परंपरेत ग्रीक शोकनाट्यासारखे शोकांतिकेचे घाट का निर्माण होऊ शकले नाहीत, याचाही उलगडा विद्यार्थ्याला करता येईल. इंग्रजी अमदानीतील 'सांस्कृतिक स्थित्यंतर आणि महाकाव्याकडून गद्यप्रधान कादंबरी वाङ्मयाकडे होणारा वाङ्मयाचा प्रवास यांतला परस्पर संबंध त्याला जोखता येईल; मिथ्य कथांत शिलीभूत झालेला संस्कृतीचा पूर्वानुभव आणि दलित साहित्यातून वा स्त्रीवादी साहित्यातून त्याच मिथकांच्या माध्यमातून संचित आशयाला विचलित करण्याच्या साहित्यिकांच्या राजकीय भूमिकेतील वाङ्मयीन डावपेचांचे नीट आकलन होईल. मीरेच्या कवितेतील राधा-कृष्ण, पु. शि. रेगे यांच्या कवितेतील राधा-कृष्ण, आशा बगे यांच्या कथेतील रुक्मिणी-कृष्ण या वाङ्मयीन अनुभवातील आदिबंधात्मक एकता आणि स्थळकालप्रवृत्तीनिष्ठ विविधता या दोन्ही गोष्टी विद्यार्थ्याला आपोआपच जाणवतील. मानव्यविद्येच्या वृहत वर्तुळात सांस्कृतिक जाणिवांचे स्रोत आणि वाङ्मयीन घाटांची वर्तुळे सामावलेली असतात. ही बहुवलयी अभ्यासपद्धती रुजविणे हे पदव्युत्तर पातळीवरील मराठीच्या अध्यापकाचे कार्य आहे. मराठीचा विद्यार्थी सर्वगुणलक्ष्यी होण्यासाठी त्याच्यात समग्रतेचे भान रुजविले पाहिजे. त्याच्या ठिकाणी असणाऱ्या बुद्धी, विचार, तर्क, कल्पना, विश्लेषण, संश्लेषण, आकलन, उपयोजन, रसग्रहणाच्या अंत:शक्तींचा विकास साधणारे अध्ययनप्रसंग निर्माण करणे हे पदव्युत्तर पातळीवरील मराठीच्या

अध्यापकापुढील खरे आव्हान आहे.

**२. सहयोगी अध्यापन पद्धती :**

पदव्युत्तर पातळीवरील वर्गातील शिक्षक-विद्यार्थ्यांचे संबंध हे अध्ययनशील समाजातील जाणत्या घटकांचे संबंध असतात. हा अध्यापन व्यवहार हा त्या त्या काळातील बौद्धिक जाणिवांचा एक मूर्त व्यवहार असतो. स्वाभाविकच येथे शिक्षक-विद्यार्थ्यांतील नाते हे आदेशात्मक असण्यापेक्षा परस्परवादी असले पाहिजे. तसे झाले तर पदव्युत्तर वर्गातील अध्यापनप्रक्रियेला एका समजुतीच्या पातळीवरील बौद्धिक देवघेवीचे स्वरूप प्राप्त होईल. अशा अध्यापनात माहितीचे वितरण होत नसते, तर ज्ञानाची निर्मिती होत असते. त्यामुळे या ज्ञानप्रक्रियेत शिक्षकाची भूमिका ही संमंत्रकाची भूमिका असते. संमंत्रणेचे हे स्वरूप सल्लामसलतीचे असते. ज्याला सल्ला द्यायचा त्याला जाणून घेतल्याशिवाय सल्लामसलतीला प्रारंभ होत नाही; आणि ज्याच्याकडून सल्ला घ्यायचा, त्याच्याविषयी विश्वास निर्माण झाल्याशिवाय सल्ला स्वीकारण्याची प्रक्रिया सुरू होत नाही. परस्परांविषयीची ही समजूत, हा विश्वास, हा मोकळेपणा ही ह्या अध्यापनप्रक्रियेची पूर्वअट असते. पदव्युत्तर वर्गातील चर्चांचे स्वरूप हे म्हणूनच स्पर्धात्मक व्हायला नको, हा चूक तो बरोबर असा जिंकण्या-हरण्याचा भाव तिथे असता कामा नये. चर्चा ह्या मुद्द्यावर अधिक प्रकाश टाकण्यासाठी, इतरांच्या अनुभवाशी सांगड घालण्यासाठी असतील. विद्यार्थ्यांच्या अध्ययनप्रक्रियेत येणारे अडसर दूर करून त्याच्या अध्यापन प्रक्रियेचा प्रवाह मोकळा करणे एवढीच शिक्षकाची भूमिका असते.

---





अनुक्रमणिका





हा सहयोगी अध्यापन व्यवहार म्हणजे आपल्या व्यक्तित्त्वातील अपुरेपणा आणि अनुभवातील कमतरता यावर मात करण्याचे माध्यम आहे. किंबहुना ही आदान-प्रदान प्रक्रिया ही स्वत:ला मुक्त करण्याची प्रक्रिया आहे. या प्रक्रियेत शिक्षकाची विद्यार्थ्यांबरोबर सहअध्यायी होण्याचीही तयारी असायला लागते; यातूनच विद्यार्थी-शिक्षक यांच्यात बौद्धिक देवघेवीचे नाते निर्माण होते. नदी किनाऱ्याला आकार देते आणि किनाऱ्यामुळे नदीच्या खळाळाला घाट प्राप्त होतो तसे काहीसे या देवघेवीचे स्वरूप असते.

बौद्धिक स्वातंत्र्य हा पदव्युत्तर अध्ययन-अध्यापनाचा कणा असतो. त्यामुळे वाङ्मयाचे अध्यापन हे एकमार्गी असणे हितकारक नसते. वाङ्मयीन संहिता आणि वाचक-विद्यार्थी यांच्यात मुक्त देवघेवीचा प्रसंग घडल्यानंतरच पदव्युत्तर वर्गातील अध्यापनास प्रारंभ व्हायला हवा. अशा वाचनप्रक्रियेत वाचक दुसऱ्याच्या अनुभवातून संहिता वाचत नाही. त्यांची स्वत:ची सामाजिक, सांस्कृतिक पार्श्वभूमी, त्याचा लौकिक अनुभव व स्मृती, त्याची वाङ्मय व कलांविषयीची समज, या सगळ्यांतून संस्कारित झालेल्या अभिरूचीचा प्रतिसाद या वाचनप्रक्रियेत अभिप्रेत असतो. या वाचनप्रक्रियेत त्याच्या व्यक्तिविशिष्ट प्रतिसादातूनच मुद्रित संहितेतील प्रतिमा, प्रतिके, उपमाने ही संहितागत चिन्हे वितळू लागतात. साहित्यकृतीत संघटित झालेल्या भावना, संकल्पना यांच्याशी वाचकांची देवघेव सुरू होते आणि साहित्यकृतीतील आशय त्यांतील सौंदर्यकारक गुणवैशिष्ट्यांसह जन्माला येतो. वाचकाच्या या व्यक्तिगत सौंदर्यानुभवाविषयी संपूर्ण आदर ठेवूनच अध्यापकाला आपला अध्यापनव्यवहार पुढे न्यावा लागतो. विद्यार्थ्याचे वय, त्याचा सामाजिक वर्ग, लिंग, त्याच्या सामाजिकीकरणाच्या प्रक्रियेची पार्श्वभूमी, त्याच्या आकलन-प्रक्रियेवर प्रभाव असणारे विविध संकेत, नमुनादर्श, भाषा व वाङ्मयाच्या पूर्वशिक्षणाचे संस्कार या सगळ्यांची जाणीव ठेवून पदव्युत्तर वर्गातील अध्यापकाला आपली अध्यापनपद्धती तत्त्वकेंद्री निरूपणपद्धतीपेक्षा अधिक लवचिक आणि संबंधलक्ष्यी ठेवणे जरूरीचे आहे. अध्यापनविषय झालेल्या साहित्यकृतीचा लेखक, अध्ययनेच्छू विद्यार्थीवाचक आणि या सहित्यकृतीवर टीका-भाष्य करणारे समीक्षक यांच्या संवादी सहभागातून वाङ्मयाविषयीची विद्यार्थ्याची समज वर्धिष्णू करण्याची प्रक्रिया पदव्युत्तर अध्यापनात अभिप्रेत आहे. येथे वाङ्मयाविषयीचे आकलन हे पूर्वसिद्ध नसते, ते निर्माण व्हावे लागते हे गृहित धरले आहे. विद्यार्थ्यांना आपल्या प्रतिसादांची समीक्षा अन्य प्रतिसादांच्या संदर्भात करण्याची सवय लावणे, कुठल्याही एका सोप्या निष्कर्षाप्रत येण्याची घाई करून चालणार नाही किंवा कुणा एका अधिकारी समीक्षकाच्या तत्त्वाचा स्वीकार करून वाचनप्रक्रियेला बंदिस्त करता येणार नाही, याची जाणीव निर्माण करावी आणि प्रतिसाद भिन्नतेतील विविधतेकडे पाहण्याची लवचिकता निर्माण करावी लागेल. या पद्धतीचे मी 'सहयोगी अध्यापनपद्धती' असे नामकरण करतो. या सहयोगी अध्यापनपद्धतीत विद्यार्थ्याचे बौद्धिक स्वातंत्र्य अबाधित राहतेच, शिवाय वाङ्मयीन संहितेविषयीच्या पूर्वकालीन वा समकालीन समीक्षकांच्या टीका-अभिप्रायांचा, तसेच अध्यापक वा विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत आकलन-अभिप्रायांचा संपूर्ण आदर ठेवला जातो. प्रत्येकाला आपापले आकलन-अभिप्राय मांडण्याची मुभा असलेला मुक्त बौद्धिक देवघेवीचा

प्रसंग निर्माण करणारे केंद्र अशी पदव्युत्तर वर्गाची ओळख निर्माण व्हायला त्यामुळे मदत होते.

सहयोगी अध्यापनपद्धतीतील विद्यार्थी आणि शिक्षक यांना एकत्रित येऊन आपला अभ्यासक्रम ठरविण्याचीही मुभा असली पाहिजे. विद्यार्थ्यांची सामाजिक-सांस्कृतिक पार्श्वभूमी, बौद्धिक ताकद, स्थानिक साधन-स्रोतांची उपलब्धता, अभ्यासविषयाच्या स्थानिक परंपरा, अध्ययनशाखेच्या वर्तमान व भविष्यकालीन गरजा लक्षात घेऊन आपापला अभ्यासक्रम ठरविण्याचे स्वातंत्र्य येथे अभिप्रेत आहे. उदाहरणार्थ, खानदेशात राजवाडे संशोधन मंडळ, समर्थ वाग्देवता मंदिर अशी आजुबाजूला अध्ययनकेंद्रे असलेल्या परिसरात पदव्युत्तर वर्गासाठी प्राचीन हस्तलिखितांचे संपादन व पाठचिकित्साशास्त्र, मध्ययुगीन संहितांचे भाषिक व तत्त्वज्ञानात्मक अभ्यास, सांप्रदायिक संज्ञापन प्रणालीनुसार व अनुदेशनाच्या गरजांनुसार पुढे आलेल्या विविध वाङ्मयीन आकृतिबंधांचा, टीपग्रंथ, भाष्यग्रथांच्या रचनातत्त्वांचा व पद्धतींचा अभ्यास, बीजग्रंथांची लघुरूपे, विस्तार-रूपे, रूपांतरे, अर्वाचीनीकरण, सुलभीकरण यांचा तौलनिक अभ्यास यांचा अभ्यासक्रमात समावेश करणे योग्य राहील. खानदेशातील सातपुड्याच्या पर्वतराईत नांदणाऱ्या भिल्ल, पावरा, बंजारा अशा अजुनही टिकून राहिलेल्या एकजिनसी समाजगटाच्या लोकसंस्कृतीचा व मौखिक वाङ्मयीन परंपरांचा क्षेत्रविशिष्ट अभ्यास, समाजभाषाविज्ञानाच्या दृष्टीतून आहिराणी, भिलोरी, पावरी, मावची अशा बोलींचे सर्वेक्षण-संपादन आणि विश्लेषण करणारा अभ्यासक्रम किंवा या बोलींच्या क्षेत्रीय शब्दनिधीचा आणि प्रमाण मराठीचा तौलनिक अभ्यास असे स्थानविशिष्ट अभ्यासक्रम आखता येतील. तसे स्वातंत्र्य तेथील पदव्युत्तर अध्यापन केंद्राला असले पाहिजे.

सर्व पदव्युत्तर अभ्यासकेंद्रात एकच अभ्यासक्रम शिकविला जातो यात बौद्धिक स्वातंत्र्याचा लोप होतो आणि क्षेत्रीय अभ्यासाच्या विकासाच्या दिशाही खुंटू लागतात. नागरी वा महानगरीय अध्यापन केंद्रांनाही परिभाषानिर्मिती,शासनव्यवहाराची व्यावहारिक मराठी, भाषिक नियोजन, संगणकीय तंत्रानुसार स्पष्टीकरण-प्रतिसादात्मक संहितांची लेखनप्रक्रिया (हायपर टेक्स्ट), विविध प्रसारमाध्यमांचे वाङ्मयीन आकृतिबंध, भाषांतर, तौलनिक साहित्याभास अशा आव्हानात्मक अभ्यासक्रमांची निर्मिती करण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे. पदव्युत्तर अध्यापनकेंद्रांच्या संशोधन-सर्वेक्षणाचा दीर्घकालीन विकास आराखड्यांशी सांगड घालून पदव्युत्तर मराठीचा अध्यापनव्यवहार होणे आवश्यक आहे. तसे झाले तर विद्यार्थी आणि शिक्षक यांच्या परस्पर सहकार्यातून नव्या ज्ञानाची निर्मिती होईल व मराठीच्या पदव्युत्तर अध्यापन केंद्रांना आज जे अडगळीचे स्थान प्राप्त झाले आहे ते दूर होईल.

पुणे विद्यापीठाचेच उदाहरण द्यायचे झाल्यास मराठीच्या अभिवृद्धीसाठी स्थापन झालेल्या या विद्यापीठाच्या मराठी विभागाला गेल्या पन्नास वर्षांत खूप काही करता येण्याजोगे आहे. या विभागाने शिलालेखांच्या व ताम्रपटांच्या अभ्यासाची एक निश्चित पायाभरणी केली. मराठी भाषेच्या व महाराष्ट्र संस्कृतीच्या अभ्यासाचे एक महत्त्वाचे दालन यामुळे खुले झाले. पदव्युत्तर मराठीच्या अभ्यासक्रमातही ह्या अभ्यासविषयाचा समावेश झाला. यादवकालीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास करताना या भाषिक अभ्यासाची पार्श्वभूमी फार उपयोगाची ठरे. अर्थात

येथे कोणा एका विभागाच्या कामगिरीचा ताळेबंद मांडायचा नाही. परंतु काही दिशा पुढे याव्यात म्हणून थोडे मागे वळून पहायचे आहे. १९५३ साली पुणे विद्यापीठाच्या पुढाकाराने भारतीय भाषाविकास परिषदेचे आयोजन करण्यात आले होते. त्यात भारत सरकार, प्रांतिक शासन, विविध विद्यापीठे, भाषा व वाङ्मयाच्या संस्था आणि तत्त्वज्ञान, सामाजिकशास्त्रे आणि विज्ञान मंडळांच्या प्रतिनिधींचा सहभाग होता. या परिषदेत तंत्रज्ञानाच्या क्षेत्रातील परिभाषेची जडणघडण, शासनव्यवहारातील राज्यभाषेच्या व राष्ट्रभाषेच्या विकासाचा प्रश्न आणि प्रादेशिक भाषांच्या विकासाच्या व अभ्यासाच्या दिशा या मुद्द्यांवर भर देण्यात आला होता. [७] परिषदेतून जे निष्कर्ष पुढे आले होते, त्यात भारतातील सर्व विद्यापीठांमधून भारतीय भाषांच्या व वाङ्मयाच्या प्रगत अभ्यासाला आणि संशोधनाला प्राधान्य द्यावे, एका भारतीय भाषेतून दुसऱ्या भारतीय भाषेत वाङ्मयाचे व विज्ञानविषयक ग्रंथांचे भाषांतर करण्याचे प्रयत्न वाढविण्यासाठी विद्यापीठांमध्ये भाषांतर विभाग सुरू व्हावेत, भारतीय भाषांची व्याकरणे, व्यवहारभाषेची पुसतके आणि द्वैभाषिक कोषांची निर्मिती व्हावी अशा शिफारशी करण्यात आल्या होत्या. (शासनाने काय करावे यासाठीही शिफारशी करण्यात आल्या होत्या; परंतु तो आपला विषय नाही.) त्यानंतर पुणे विद्यापीठातून विविध शास्त्रांच्या इंग्रजी-मराठी परिभाषा कोशांची निर्मिती झाली. भाषाविज्ञानाचे व संस्कृतचे प्रगत अध्ययन केंद्रही स्थापन झाले. डेक्कन कॉलेजमधील प्रगत भाषाविज्ञान केंद्रात ध्वनिशाळा निर्माण करण्यात आली, संस्कृत व आर्य भारतीय भाषांच्या शब्दकोश-निर्मितीचे आणि मराठीच्या बोली सर्वेक्षणाचे प्रकल्पही राबविण्यात आले. ना. गो. कालेलकर यांच्या ध्वनिविचार, भाषा व बोली ही पुस्तके आणि प्रा. घाटगे यांनी संपादित केलेली वारली, कुणबी, गावडी, कोकणी इ. बोलींची परिचय पुस्तके ही त्यांची फलश्रुती आहे. या सगळ्या प्रकल्पांशी पदव्युत्तर मराठीचे अध्यापन जोडले गेले असते तर आज मराठीच्या विकासाचे चित्र आणखीनच उन्नत दिसले असते.

थोडक्यात सांगायचे झाल्यास पदव्युत्तर मराठीच्या अध्यापनाची गुणवत्ता वाढविण्यासाठी अभ्यासक्रम-निर्मितीतील उपक्रमशीलता वाढविण्याची गरज आहे. ही उपक्रमशीलता आणण्यासाठी पदव्युत्तर अभ्यासकेंद्रांना व पदव्युत्तर शिक्षकांना काही प्रमाणात स्वतंत्र अभ्यासक्रम तयार करण्याची मुभा असली पाहिजे. पदव्युत्तर अभ्यासकेंद्रांचा स्वत:चा विकास आराखडा असला पाहिजे आणि त्यातील सर्वेक्षण, संशोधनादी अभ्यासप्रकल्पांना पूरक ठरणारे अभ्यासक्रम, अध्ययनपद्धती व मूल्यमापन तंत्रे निर्माण करण्याचे स्वातंत्र्य या विभागांना देता आले पाहिजे. अशी लवचिकता लाभली तर परिभाषानिर्मिती, शब्दशोधनकोश, भाषांतर, पाठ्यपुस्तके व पुरवणी वाचनमालांची निर्मिती, प्रमाणभाषा व बोलींचे कोश, संगणकासाठी लागणारी व्याकरण व शुद्धलेखनाची उपकरणे, प्रतिसादमूलक संहिता लेखन तंत्र यांचा अभयासक्रमात थेट समावेश केल्यास मराठी भाषेच्या संवर्धनासाठी पदव्युत्तर अध्यापन केंद्रे क्रियाशील योगदान देऊ शकतील. एखादा सोन्थायमर येऊन धनगरांच्या लोकगीतांचा, वारकऱ्यांच्या ओवी-अभंगांचा थेट लोकांमध्ये जाऊन अभ्यास करतो, त्या अभ्यासातून खंडोबा आणि विठोबा या दैवतांशी बांधलेल्या मराठी समाजाच्या सांस्कृतिक-वाङ्मयीन परंपरांचा चित्रपट निर्माण करतो तशी

मराठीच्या पदव्युत्तर अध्यापन केंद्रातूनही थेट लोकांमध्ये जाऊन अभ्यास करण्याची नवी उपक्रमशीलता येऊ शकेल. विद्यापीठ विषय नेमीत नाही, पुस्तके नेमते या आक्षेपातूनही मोकळे होता येईल.

अर्थात काही बाबतीत पायाभूत अभ्यासक्रमांचा सारखेपणा असायलाच लागेल. त्यासाठी मानव्यविद्या आणि सामाजिकशास्त्रांचा एक अधिष्ठान अभ्यासक्रम असायला हवा. मानवीसंस्कृतीच्या वाटचालीतले प्रमुख टप्पे अणि सांस्कृतिक आविष्कारांच्या अभ्यासपद्धती यांचा त्यात समावेश असावा. भाषा व वाङ्मयाच्या अभ्यासाची विद्याशाखानिष्ठ अध्ययनपद्धती रुजविणे हे या अधिष्ठान अभ्यासक्रमाचे उद्दिष्ट असावे. त्याचबरोवर भारतीय दर्शने, पाश्चात्त्य भाषा तत्वज्ञाने यांतून आलेली युक्तीवादाची उपकरणे व विश्लेषण तंत्रे यांचाही अधिष्ठान अभ्यासक्रमात समावेश असावा. महाराष्ट्राची सांस्कृतिक जडणघडण हा दुसरा अधिष्ठान अभ्यासक्रम असावा. दोन अभ्यासक्रम हे त्या त्या पदव्युत्तर अध्यापन केंद्रांना निवडण्याची मुभा असावी. त्यात क्षेत्रीय कार्य, उपयोजन व तांत्रिक साधन निर्मिती यावर भर असावा आणि उरलेले चार अभ्यासक्रम हे वाङ्मयेतिहास, समीक्षा, वाङ्मय प्रकारांचा अभ्यास यासारखे असावेत. भाषा व वाङ्मयशिक्षणाचा, भाषांतरविद्येचा, भारतीय वाङ्मयाच्या तौलनिक अभ्यासाचा वैकल्पिक अभ्यासक्रमात जरूर समावेश असावा. मुख्य म्हणजे अभ्यासक्रम निवडण्याचे विद्यार्थ्यास पूर्ण स्वातंत्र्य असावे. शिक्षकाला स्वत:चा अभ्यासक्रम तयार करून तो शिकविण्याचे स्वातंत्र्य असावे आणि प्रत्येक पदव्युत्तर अभ्यासकेंद्राला स्वत:चा विकास आराखडा व त्याच्याशी संबंधित अध्यापनतंत्रे विकसित करण्याचे स्वातंत्र्य राहिले तर पदव्युत्तर मराठीचे अध्यापन हे अधिक गुणवत्तापूर्ण, सर्जनशील व समाजोपयोगी होईल यात शंका नाही.

संदर्भ :

१. भागवत श्री. पु. व इतर (संपा) : (१९८७) : साहित्य : अध्यापन आणि प्रकार, मौज-पॉप्युलर, मुंबई. (प्रस्तावना)
२. पटवर्धन वा. ब. : 'काव्य आणि काव्योदय'
३. कस्तुरे यज्ञेश्वरशास्त्री : (१९५७) : रसविचार आणि प्राचीन दर्शनकार, मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद.
४. दादेगावकर पद्माकर : (१९९४) रसचर्चा, पॉप्युलर, मुंबई.
५. गिंडे वा. पु., द. दि. (संपादन) (१९९४) : वाङ्मयाचे अध्यापन, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.
६. पटवर्धन वि. वि. : (१९६४) वाङ्मयेतिहासाची रचना : ध्येय, दृष्टिकोण व पद्धती, साहित्यविचार (प्रा. रा. श्री. जोग गौरव ग्रंथ) (संपादन - गोखले, भावे, पाध्ये), व्हीनस, पुणे.
७. Report regarding The Indian Languages Development Conference (1954) : The Poone University Press, Pune.

□

डॉ. र. ना. वरखेडे
संचालक, मानव्यविद्या व सामाजिकशास्त्रे विद्याशाखा
यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक.



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


महाराष्ट्र साहित्य परिषद

# 'कै. ग. ल. ठोकळ पुरस्कार : एक आढावा

डॉ. मिरदेव गायकवाड

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने १९८९ पासून दरवर्षी उत्कृष्ट ग्रामीण साहित्यास (यामध्ये कथा, कादंबरी, काव्य इ. ललित साहित्य) ग. ल. ठोकळ पुरस्कार दिला जातो. ग्रामीण जीवनातील तापाव्यापांचा परिचय मराठी साहित्यामध्ये कितपत झाला आहे याचा एक प्रकारे शोध घेण्याचा हा प्रयत्न आहे.

लोक साहित्यातून ग्रामीण जीवनाचे दर्शन घडत असले तरी खऱ्या अर्थाने ग्रामीण जीवनाला वाङ्‌मयाचा विषय बनविण्याचे श्रेय कै. ग. ल. ठोकळ यांनाच द्यावे लागेल. मराठी ललित साहित्य नागर संस्कृतीपुरतेच जे सीमित होते ते विस्तारत गेले आणि ग्रामीण मानस पकडण्याचा प्रयत्न अनेक लेखक करू लागले. 'गावगुंड' ही कादंबरी, 'मीठभाकर' काव्यसंग्रह हे ठोकळांच्या ग्रामीण वास्तवाचे मर्मभेदी आकलन म्हणून बघण्यासारखे आहे.

झुंजू मुंजू झालं — सुखदेव वर आला
पहाटेचं वारं कसं — झोंबतं अंगाला
परसात माझ्या बाई — आरवतंच कोंवडं
लई वक्त झाला — आता फुटलं तांबडं
वाढूळ वढते वाई — जातं घर घर
पारूस गं काम माझं — पडलं घरभर
राया तुझ दान जसं — धुतलं तांदूळ
रामा तुझं व्हाट जसं — फुटलं डाळिंब

यासारख्या जात्यावरच्या गाण्यांमधून ठोकळ अस्सल ग्रामीण प्रतिमा उभ्या करतात. ग्रामीण वातावरणाचा आढळ मोकळेपणाने अशा वर्णनातून येतो.

अनेकांची अशी समजूत आहे की, ग्रामीण साहित्य म्हणजे खेडुतांच्या वावळटपणाचे दर्शन. अनेकांनी सवंग विनोदासाठी ग्रामीण वातावरणातील चित्रे निवडली; मग अशा पात्रांचे अडाणीपण, अंधश्रद्धा, अक्षरशत्रुत्व यावर भर दिला. ग्रामीण मानस असे वरवरचे अवलोकन करून सापडणार नाही. त्या व्यक्तीला पांडित्यप्रदर्शन करता आले नाही, तरी व्यावहारिक सूज्ञपण नक्कीच आहे. हा माणूस आपल्या दैनंदिन जीवनातील अनेक गुंते उलगडू शकतो तसेच अनेकांना गुंत्यातही टाकू शकतो. तो व्यासपीठावरून बोलणार नाही, ते त्याला जमणारही नाही; पण बसल्या बैठकीत त्याने निर्माण केलेले तिढे उलगडताना भल्याभल्यांची दमछाक होते. हे नागर लेखकांना हेरता आले नाही. साहित्यात पकडता आले नाही.

खेडे आता पूर्वीसारखे राहिलेले नाही. ते आता अर्धनागर बनले आहे. याचे श्रेय तेथील शिक्षण



अनुक्रमणिका

प्रसाराला आहे तसेच स्वातंत्र्योत्तर काळातील विकासाही आहे. अनेक शिक्षण महर्षींनी ग्रामीण भागापर्यंत शिक्षणाचे जाळे निर्माण केले. विशेषत: रयत शिक्षण संस्था आणि स्वामी विवेकानंद शिक्षण संस्था यांचे कार्य ग्रामीण भागात मूळापर्यंत पोहोचले. तसेच काही राजकीय मुत्सद्यांनी जगाचा अनुभव घेऊन खेडी सुधारण्याचा प्रयत्न केला. सहकार चळवळीचे जाळे निर्माण केले, त्यातून शेतीचा विकास साधला. लोक पैसे देणारी पिके घेऊ लागले. सुबत्ता आली. सुबत्तेवरोबरच जशा चांगल्या गोष्टी आल्या तशाच माणुसकीतील दुरावाही दिसू लागला. हे सगळे बदल ललित लेखकास टिपता आले पाहिजे. ग्रामीण साहित्याचा आढावा घेताना ललित लेखकांनी किती प्रमाणात अशा बदलांना स्पर्श केलेला आहे हेही या निमित्ताने पाहिले पाहिजे. दुष्काळाच्या खाईत अस्थिपंजर झालेली माणसे रेखाटणे एवढेच ग्रामीण साहित्य नाही, तर पाटाचे पाणी मिळू लागल्याने खिशात चार पैसे खुळखुळू लागल्याने मदांध झालेली माणसेही याच समाजस्तरातून उगवू लागली आहेत याचाही वेध घेता आला पाहिजे. आता तो केवळ दुधाची जनावरेच पाळत नाही, शेतीला उपयोगी पडणारीच जनावरे पोसत नाही, तर आपले शोक पूर्ण करण्यासाठी घोडा, वळू, ससे यासारखे प्राणीही पाळू लागला आहे. दोन पैसे मस्तीत उधळू लागला आहे. नको त्या गोष्टींची इर्षा धरू लागला आहे. ह्या सगळ्या कंगोऱ्यांना साहित्यिकांचा स्पर्श झाला पाहिजे.

ठोकळ पारितोषिकासाठी ग्रामीण कलाकृतीचा विचार करताना परीक्षक या दिशेने कलाकृतीचे मूल्यमापन करताना दिसतात. आत्तापर्यंत ज्या परीक्षकांनी या ललितकृतींना तपासले त्यामध्ये सर्वच परीक्षक कसलेले होते यात शंकाच नाही. यामध्ये श्रीमती शांता शेळके, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. अनुराधा पोतदार, डॉ. अरविंद वामन कुलकर्णी, डॉ. वीणा देव, राजा फडणीस, डॉ. स्नेहल तावरे, डॉ. मिरदेव गायकवाड, डॉ. जयवंती पाटील, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. वासुदेव मुलाटे, डॉ. विजय कसबेकर, डॉ. कृष्णा किरवले, डॉ. अविनाश आवलगांवकर. डॉ. मनोहर जाधव, डॉ. मंदा खांडगे इत्यादी परीक्षकांनी काम केले आहे.

डॉ. मिरदेव गायकवाड

*(एम्. ए., पीएच. डी.)*

डॉक्टरेटसाठी संशोधनाचा विषय : ऐतिहासिक चित्रण.
(कादंबरीतील शिवाजी आणि शिवकालाचे चित्रण.)

प्रकाशित साहित्य :

१) ढेलन (कादंबरी)
२) मराठी लावणी :
निर्मिती आणि स्वरूप (समीक्षा)
३) गतिधारा (संशोधन)
४) मराठी गझलेची बंदिश (समीक्षा)
५) भारतीय वैज्ञानिक - भाग १, २
(बालवाङ्मय)

याशिवाय एक कथासंग्रह, एक कादंबरी प्रकाशनाच्या मार्गावर आहे. अनेक ललित लेख, समीक्षा लेख, कथा, कविता यांचे लेखन. 'उकणिका' ह्या काव्याच्या नवीन प्रकाराची निर्मिती. दूरदर्शन, आकाशवाणी येथे काव्यवाचन, पुस्तक परीक्षण. म सा. प.च्या ठोकळ पुरस्कारासाठी परीक्षक म्हणून काम.



अनुक्रमणिका

१९८९ चा ठोकळ पुरस्कार राजन गवस यांच्या 'भंडारयोग' या कादंबरीस मिळाला. ग्रामीण मनाची सांकेतिकता त्यामधून मांडण्याचा प्रयत्न केला आहे. तर १९९० चा पुरस्कार रामचंद्र पठारे यांच्या 'पाचर' या कादंबरीस दिला.

'पाचर' या कादंबरीमध्ये रामचंद्र पठारे यांनी ग्रामपातळीवरील राजकारणाचे पदर उलगडून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. गावात परंपरेने चालत आलेले सरंजामशाही राजकारण, परंतु स्वातंत्र्योत्तर काळातील राजकीय, सामाजिक, आर्थिक क्षेत्रात दलितांना दिलेले झुकते माप; दलितांविषयीच्या सरकारी कळवळ्याची पाचर ग्रामीण राजकारणात सतत बसत असते असे असले तरी ह्या दलित कळवळ्याला पुरून उरणाऱ्या हिकमती नेते मंडळींची चालही दाखविली आहे.

कल्याणसिंह हा या गावचा सरपंच आहे. तो आपल्या राजकारणासाठी दलितांना सगळा पाठिंबा देतो; पण त्यांबरोबरच या दलितांचाही अलवारपणे काटा काढीत असतो. दलितांच्या ध्यानीमनीही, हे राजकारण येत नाही. याच्या जोडीला साधूची भोंदुगिरी, मुंबईसारख्या शहरातून आलेल्या दलित पोरांचे अर्धवट ज्ञान, त्यातून सर्वच दलितांना भोगावे लागणारे दुःख ह्यांचे दर्शन घडविले आहे. तर कुठे दलितांचा कळवळा येऊन गळा काढणारे दलित तरुण आपल्याच बांधवांना कसे नाडतात तेही दाखविले आहे. बुधा, वाहरू, मक्या, झापाळ्या यांची दलितवस्ती लुटण्याची चाल आणि त्यावर कल्याणरावाने हिकमतीने केलेली मात असे चित्र या कादंबरीत रंगविले आहे.

ग्रामीण जीवनात दलितांची कशी ससेहोलपट होत असते; त्यांच्या स्त्रियांची अब्रू कशी लुटाली जात असते, दलित पुरुषांची फसवून नसबंदी कशी केली जात असते, त्याबरोबरच पैशाच्या किणकिणीवर आत्मभान विसरणारे दलितही कसे आहेत... इत्यादी गोष्टींचे चित्रण येथे येते. परंतु कादंबरीकाराला त्यामध्ये म्हणावी तशी भेदकता आणता आली नाही. ते चित्रण थोडेफार सवंगतेच्या पातळीवर उतरते. दलितांची कैफियत मांडता मांडताच हा लेखक सवर्णांचीच कैफियत मांडत आहे की काय असे वाटू लागते. आणि विषयाशी प्रतिरूप असे दलितांचे अश्लिल चाळे त्यातूनच रंगविलेले वाटतात; बबुशाचे अश्लील चाळे, किंवा झापाळ्याची वासना रंगविणे कादंबरीला आवश्यक होते का हा प्रश्न पडतो. दलित आपल्या एका गावात आश्रम स्थापन करतो, तेथे दर्शनासाठी लोकांची रीघ लागू लागते. गांज्यासारखे पदार्थ पोती भरभरून येतात. हे सगळे अवास्तव वाटू लागते. ग्रामीण समाज झापाळ्याला सतत बघत होता. जादूची कांडी फिरावी तशी त्याच्या बाबतीत किमया घडून जाते. ग्रामीण मन इतके जड नक्कीच नसते. त्यालासुद्धा योग्य काय, अयोग्य काय याची शहानिशा करता येते. तेवढे चैतन्यत्व त्याच्यातही सळसळत असते. असे असताना सरसकट या मनाला मुर्दाड बनविण्याचे कारण काय? ह्याचा आढावा घेऊन मांडणी करणे आवश्यक असते.

या कादंबरीत साखर कारखान्याचा उल्लेख येतो पण तेवढ्यापुरताच. तो विषय, आणि त्यास अनुरूप असे बारकावे, लोकांचे वर्णन इत्यादी गोष्टींची चर्चा येत नाही. असे असले तरी कादंबरी खून, मारामारी, कोर्ट-कचेरी या पारंपारिक विषयात अडकून पडत नाही. ही एक जमेची बाजू आहे.

१९९१ चा ठोकळ पुरस्कार महादेव मोरे यांच्या 'झोंबड'ला, तर १९९२ चा पुरस्कार उत्तम बावस्कर यांच्या बुजगावनं या ग्रंथास मिळाला. पैकी महादेव मोरे हे कसलेले लेखक आहेत. त्यांच्या

ललित लेखनात उत्तरोत्तर प्रगती दिसतेच. पण उत्तम वावस्कर यांच्या 'बुजगावन्या'चा थोडाफार समाचार घेतला पाहिजे.

'झोंबड' ही महादेव मोरे यांची कादंबरी, महादेव मोरे यांनी या कादंबरीत रुढ, चाकोरीबद्ध ग्रामीण जीवनाचे चित्रण केलेले नाही; तर ग्रामीण समाजात होत असलेल्या वैचारिक, परिवर्तनाचे चित्र रेखाटले आहे.

झोंवड म्हणजे झोंबाझोंबी किंवा संघर्ष. या कादंबरीच्या नावातच विषयाचे आकलन होते. हा संघर्ष पारंपारिक, सरंजामशाही विरुद्ध कामगार असा आहे. त्यामध्ये कामगारांची आंदोलने, शेतकऱ्यांची आंदोलने, सरकारी तिजोरीवर गलेलठ्ठ झालेल्या पुढाऱ्यांची जनतेवावतची उदासीनता इत्यादी गोष्टींचा उहापोह केलेला आहे. विशेषत: विडी कामगार स्त्रियांच्या कष्टांचे शोषण विडी कारखानदार कसे करीत असतात, हे दाखवून प्रा. कुकर्णीसारखा एखादा समाजसेवक ह्या विडी कामात स्त्रियांची संघटना बांधून कामगार कायदे आणि हक्क यांची जाणीव कशी करून देतो, हे दाखविले आहे. तसेच तंवाखू पिकविणारे, वटाटा पिकविणारे शेतकरी शेतीमालाला भाव देण्यावाचून कसे नागविले जातात, ते दाखविले आहे. त्यासाठी 'रास्ता रोको' आंदोलनासारखी आंदोलने घडून येऊ लागतात. पण निवडून दिलेले पुढारी मात्र दूरच असतात.

अशी जनजागृती होत असतानाच स्थानिक पुढारी अशा संघटित झालेल्या लोकांकरवी फायदा उठविण्यासाठी कसे टपलेले असतात अणि तेथेही पुन्हा अशा स्थानिक पुढाऱ्यांमध्ये कसे झोंवड निर्माण होतं तेही सूचित केले आहे.

एका वेगळ्या वळणाने जाणारी ही ग्रामीण कादंवरी म्हणता येईल.

'बुजगावनं' ह्या कथासंग्रहात बावस्करांनी ग्रामीण जीवनातील ताणतणाव चांगल्या प्रकारे पकडण्याचा प्रयत्न केला आहे. शेतकऱ्याच्या जीवनातील बैलावर असणारे त्याचे जीवाचे प्रेम, त्यातून निर्माण होणारी भावनिक आंदोलने इत्यादींचे चित्रण येते. 'पोळा'सारखी कथा या दृष्टीने पाहण्यासारखी आहे. बैलाच्या जीवनाशी एकरूप झालेले शेतकरी मन येथे संपृक्त होऊन दिसू लागते. 'उबग', 'कोंडमारा', 'ओढ' या कथांमधून ग्रामीण जीवनाचे संस्कार घेऊन वावरणारी पिढी; आधुनिक, बदलत्या जीवनप्रवाहाशी जमवून घेताना दिसत नाही. त्यामुळे आपल्या घराण्यांवावत, घराण्यातील संस्काराबाबत उराशी बाळगलेल्या भावनांना तडा जातो. आपली मुले आणि सुना यांच्याबाबत त्यांच्या माफक अपेक्षा असतात. त्याच उध्वस्त होताना दिसतात. त्यामुळे हे जुन्या मूल्यांवर पोसलेले संस्कारी मन गुदमरू लागते. जुनी आणि नवी अशा दोन्हीही पिढ्या जगतात. पण त्या जगण्यात साजिरेपण नसते. अपेक्षित सुखाला त्या पारख्या होतात. काहीही चूक नसताना दोन्हीही पिढ्या मनाने खुरट्या बनू लागतात.

याशिवाय त्यांनी आपली दृष्टी चौफेर फिरविली आहे. श्रीमंतीच्या उबेने मस्तावलेल्यांकडून सर्वसामान्यांची होणारी ससेहोलपट त्यांनी टिपली आहे. त्यातून पैसे देणाऱ्या उसासारख्या पिकाची नासाडी, श्रेष्ठत्वाच्या कल्पनेने उथळ झालेल्यांकडून घडणारे, हुंडाबळी या विषयांचाही आढळ त्यांच्या कथांमधून होतो. 'जीत', 'डोंब' यासारख्या कथांमधून सवर्णांवर होणाऱ्या अन्यायाचे










चित्रण दिसते. सवर्णांमध्येही अनेक दलित असतात हेच त्यातून त्यांना दाखवावयाचे आहे. दारिद्र्याशी सतत दोन हात करीत जगणाऱ्या ग्रामीण सवर्ण तरुणांना 'राखीव' संकल्पनेने उपेक्षित केले आहे त्यामुळे हे सवर्ण तरुण पेटून उठतात आणि या सर्व समाजव्यवस्थेलाच चूड लावावी म्हणून बंड करू पाहतात. या राखीव जागांमुळेच आमच्या नशिबी ही फरफट आली असे ते म्हणतात.

रवींद्र शोभणे यांच्या 'कोंडी 'आणि अनिल अ. पाटील यांच्या 'बिजानं धरलाय कोंब' या दोन ग्रंथांना १९९३ चा पुरस्कार प्राप्त झाला.

ठोकळ पुरस्काराच्या सुरुवातीपासून पुरस्कारप्राप्त ग्रंथांकडे पाहिले तरी एक गोष्ट लक्षात येते की, उत्तरोत्तर लेखन कसदार होताना दिसते आहे. केवळ लेखनासाठी लेखन केलेले दिसत नाही. 'कोंडी' मध्ये याचा बराचसा प्रत्यय येतो.

प्रचलित राजकारणासारखे राजकारण नसलेले, पण एखाद्याला जीवनातून उठविण्याइतके पुरेपूर अंगात भिनलेले राजकारणी चाळे असे गावपातळीवरील पुढारी त्यांच्या मनमानी, लीलांचा सामान्य माणसांना बसणारा फटका, आणि त्यांच्या आपमतलबी राजकारणामुळे भरकटलेला तरुण पुन्हा मार्गावर येऊ पाहात असताना त्यांची झालेली कोंडी हे सगळे या कादंबरीत दाखविण्याचा प्रयत्न शोभणे करतात. तथाकथित वडी मंडळी एखाद्या तरुणाच्या सामर्थ्याचा स्वत:च्या स्वार्थासाठी उपयोग करून घेतात आणि गरज संपताच त्याला गल्लीच्या कुत्र्यासारखे झिडकारित असतात. ज्यांनी तरुण वर्गाला दिशा देण्याचे काम करावयाचे असते तेच मदांध होतात आणि स्वत:भोवती फिरत फिरत स्वत:ही निस्तेज होतात. त्यामध्ये ना स्वत:चा विकास ना गावाची प्रगती. झालीच तर आधारहीन तरुणांची तडफडच. या तरुणांच्या सर्व कुटुंबासच जणू काय पूर्व जन्मीचे अदृश्य शाप भोगावे लागतात. त्यामुळे हे तरुण अधिकच विमनस्क होतात, आक्रमक बनतात आणि विचारहीन क्रोधाचा एक पिसाट असा भाग बनतात. विचारशक्ती कुंठीत होते आणि सूडभावनेने पेटत जातात. त्यांच्या या धगधगत्या सूडभावनेत कोपाची आहुती जाईल याचीही त्यांना पर्वा नसते.

'कोंडी' या कादंबरीचा वसंता हा नायक आहे. तसा तो व्याज नामकच म्हणावा लागतो. त्याची कोंडी झालेली दिसते. शामराव पाटील आणि रामदास पाटील हे दोन मातब्बर इसम. शामराव पाटलाने आपल्या बापावर अन्याय केला म्हणून वसंता चिडतो. त्याला अद्वातद्वा बोलतो. हीच संधी रामदास पाटील साधतो. जवळ येणाऱ्या ग्रामपंचायतींच्या निवडणुकीवर डोळा ठेवून तो वसंताला जवळ करतो. त्याच्या पैलवानी शक्तीचा उपयोग करून घेतो.

वसंताच्या वडिलांना वसंताचे वागणे पटत नाही. त्याचे दोन्ही हात शामराव पाटलाच्या मळणीयंत्रावर काम करताना मनगटातून तुटतात. तरी शामराव पाटलाच्या विरोधात तो जात नाही. कारण त्याचे जन्मभर उपकार असतात. म्हणून तो वसंतालाच घरातून हाकलतो. रामदास पाटील वसंताला आधार देतो.

मात्र वसंताची गरज संपताच रामदास पाटीलही त्याला हाकलून देतो. येथूनच वसंताच्या आयुष्याची गुंतागुंत वाढत जाते. त्याची वाईट प्रतिमा निर्माण केली जाते. त्याचा अनैतिकतेशी संबंध जोडला जातो. सगळा गावच वसंताला आता झिडकारू लागतो त्याला कोणी कामही देत नाही. अशी त्याची सर्व बाजूंनी कोंडी होऊ लागते.

जेव्हा तरुण रक्त बिघडू लागते तेव्हा सधन लोक स्वार्थासाठी त्याचा उपयोग करून घेतात. मात्र जे सुधारू पाहतात त्यांना कोणी मदत करीत नाही असा हा उफराटा समाज आहे. अशा कात्रीत सापडलेल्या तरुणाची अवस्था केविलवाणी वनते. स्वार्थाआड येणाऱ्याची अवस्था खडे मारून रक्तवंबाळ केलेल्या बेडकीसारखी होते. शारीरिक सामर्थ्य क्षीण झाले की गलेलठ्ठ पुढारी त्यांचे हाल करतात. कारण त्यांना त्यांच्या तहहयात वर्चस्वाला आव्हान नको असते. ज्यांचा उपयोग करून घेतला त्यांच्या पंखात काटे टोचून फुलपाखराला सोडावे तसे सोडतात आणि त्याची गंमत बघत बसतात. शेवटी गलितगात्र झालेले फुलपाखरू आपल्याच कुंपणावर विसावणार आहे याची त्यांना जाणीव असते.

अरुण जाखडे यांच्या 'एक एक काडी गवताची' आणि सदानंद देशमुख यांच्या 'लचांड' या पुस्तकांना १९९४ चा पुरस्कार मिळाला.

लचांड हा कथासंग्रह आहे. यास ग्रामीण पुरस्कार मिळालेला असला तरी या कथासंग्रहातील सर्वच कथा ग्रामीण आहेत असे म्हणता येणार नाही, तरी पण ग्रामीण जीवनाची पार्श्वभूमी असलेला हा कथासंग्रह प्रगतीच्या खुणा नक्कीच दाखवतो.

निवेदकाने या कथांमधून फक्त ग्रामीण घटनांची मांडणी केलेली नाही तर ग्रामीण मनाचे पदर उलगडून दाखविण्यात ते यशस्वी झाले आहेत : पात्रांच्या मनातील आंदोलने टिपता टिपता एक जीवन जगण्याची पद्धती मांडू पहातो आहे. या संग्रहाला मनोविश्लेषणात्मक वगैरे म्हणता येणार नाही. पण 'मन' हे केंद्रबिंदू आहे. त्याच विषयाभोवती काही कथा फिरताना दिसतात.

'सुगी' सारख्या कथेतून तरुण पोरांच्या मनात होत असलेली शृंगारभावनेची वळवळ दाखविली आहे. पण यातही सूचकता आहे. भडक शृंगार नाही, की पिकाच्या सुगीचे यथासांग वर्णनही नाही. सुगी ही प्रतिमा म्हणून येते. सुगी उरकल्यावर पाखरे जशी दूर पळतात, तशीच गणपाच्या घरातील सुगीच्या मोसमात असलेली सुशी लग्न होऊन सासरी गेली की तिचीही सुगी उरकल्याने खडकावर पोहोयाला येणारी पोरे गणपाच्या घराकडे पाहून शिट्ट्या वाजवायलाही विसरून जातात. 'पोळा' ह्या कथेत ऐपत नसतानाही लंबाट्याने सात हजाराची बैलजोडी आणली. गावच्या पाटलांच्या बैलजोडीपेक्षाही सरस असलेली ती जोडी सर्व भागात कौतुकाचा विषय झाली. त्यातील एका बैलाला पोळ्याच्या दिवशीच कोणी तरी मूठ मारली आणि लंबाट्याचा सारा संसाराच सैरभैर झाला. तर 'येतकर' या कथेतून दलितांच्या ठिकाणी निर्माण झालेली स्वत्त्वाची जाणीव रेखाटलेली आहे.

श्री. अरुण जाखडे यांच्या कथांपैकी 'एक एक काडी गवताची' आणि 'दोन थेंब रक्ताचे' या कथा बऱ्याचश्या मनोविश्लेषणाच्या अंगाने जातात. स्वत:च्याच आंतरविश्वाचा ठाव घेण्याचा प्रयत्न करतात. ह्या कथांना म्हटले तर कथानक नाही. एकेका आठवणीतून अंत:करणाचे पदर उलगडत नेले आहेत. त्याचप्रमाणे 'भूताटकी' 'डॉक्टर पळाला' या कथांमधून ग्रामीण जीवनातली श्रद्धाळू समाजमन दाखविले आहे. सत्य-असत्य, चांगले-वाईट या कशाचाही साकल्याने विचार न करता हे समूहमन आंधळ्या निष्ठेने पारंपारिक गोष्टींच्या मागेच कसे धावत असते हे या कथांमधून दाखविले आहे.

श्री. जाखडे यांच्या कथांमधून मानसिकतेचा वेध घेण्याचा प्रयत्न होताना दिसतो. मात्र अनेकदा

कथा इतकी कलात्मक पातळीवर सरकत असताना मध्येच त्यांना निवेदन करण्याचा, भाष्य करण्याचा मोह होताना दिसतो. कथेतील आशय वाचकांना समजावून सांगण्याचा प्रयत्न करताना दिसतात. उदाहरण म्हणून फक्त एकच उल्लेख करतो. 'भुताटकीचा मळा' या कथेत ते म्हणतात.

'इथं भुतं आहेत ते अंधश्रद्धेची. या अंधश्रद्धेच्या भुताला हात आहेत भीतीचे. हे अंधश्रद्धेचे भूत मानगुटीवर बसते आणि भीतीच्या, हाताने डोळे घट्ट झाकून काळोख करते...''

असे अनेक ठिकाणी झाले आहे. त्यामुळे कथेतील कलात्मकता थिटी पडू लागते आणि कथा प्रबोधनाच्या पातळीवर येते. ती नुसतेच प्रबोधन करीत नाही, तर प्रचार करू लागते. हे साहित्याच्या लालित्याला मारक आहे. कथेचे 'असणे' असावे. तिने काहीही शिकविण्याचा अट्टाहास करू नये. असे असले तरी श्री. अरुण जाखडे यांच्या कथा उत्तरोत्तर कसदार होत जातील याबद्दल शंका नाही.

डॉ. भीमराव वाघचौरे यांच्या 'पाणघळी' या कादंबरीस १९९५ चा पुरस्कार प्राप्त झाला. 'पाणघळी' ही कादंबरी म्हणजे भगाच्या दुर्दैवी जीवनाची कहाणी आहे. व्यवहाराचे चटके बसून कृतज्ञता मानण्याइतकी तरुणाची बुद्धी बोथट झालेली नसते या गोष्टीचा प्रत्यय प्रस्तुत कादंबरीत येतो. उमेदीचे सर्व आयुष्य आई-बापाविना पोरके असलेल्या पाठच्या भावांसाठी झिजविण्याचा भगा आणि त्याची बायको परभा यांच्या उतार आयुष्यातील जीवनाची फरफट अंत:करणाला चटके देवून जाते. ज्यांच्यासाठी पित्याचे छत्र बनून भगा उभा राहिला ते जगू आणि दिना हे दोन्ही भाऊ. पण त्यांनाही भगाच्या हालअपेष्टाची जाणीव राहिली नाही. आपल्या बायकांबरोबर चैनीत दिवस घालविताना त्यांना भाऊ-बहिणी यांची साधी विचारपूसही कराविशी वाटली नाही. दारिद्र्याच्या झळांनी जर्जर होऊन त्यातच भगाचा अंत होतो.

ग्रामसंस्कृतीमधील संस्कार अजूनही पूर्णपणे नष्ट झालेले नसतात. वडीलकीच्या कर्तव्याने हे घटक आपले कर्तव्य बजावत राहतात. ज्या भावांनी दुरावा निर्माण केला त्याच भावांच्या भेटीची आस भगाला लागून राहते. अंतसमयी त्यांची चातकासारखी तो वाट पाहतो. राहिलेला जमिनीचा तुकडाही त्याच भावांच्या नावाने करून ठेवतो. आपल्या जीवनाचे मातेरे झाले तरी आपले भाऊ मार्गी लागले पाहिजेत ही चिवट इच्छा तेथे असते आणि त्याला साथ देणारी त्याची पत्नी - परभा - हीसुद्धा सोशिक आहे. जणू काय त्याच्यासाठी तिला परमेश्वराने जन्मास घातले आहे. अशी ही कादंबरी ग्रामजीवनाच्या बटबटीत चित्रणात अडकत नाही; किंवा सांकेतिक चित्रणातही गुंतत नाही.

शेतात पावसाचे पाणी पडते. पाणी वाहून जाते. त्यामुळे जमिनीची झीज होते. तेथे घळी पडतात. शेतातील घळीप्रमाणेच भगाच्या जीवनातही दारिद्र्याच्या घळी पडल्या आहेत. घळी बुजविल्या नाहीत तर शेताची धूप ठरलेली त्याप्रमाणेच भगाच्या आयुष्याची धूपही सतत होत जाणारी. दारिद्र्याची झळ बुजविण्याचा प्रयत्न भावांनी केलाच नाही. अखेर त्यातच त्याचा अंत होतो. बरड झालेल्या रानाप्रमाणे त्याचे जीवनही चैतन्यहीन होते. वैराण होते.

१९९६ चा 'ठोकळ पुरस्कार' डॉ. बापुसाहेब देसाई यांच्या 'खादेशी साहित्य सुरभि' आणि श्रीराम दुर्ग यांच्या 'घडई' या दोन्ही पुस्तकास विभागून देण्यात आले आहे.

अहिराणी भाषेतील साहित्य प्रकारांचा सुगंध 'खानदेशी साहित्य सुरभि'मध्ये पकडण्याचा प्रयत्न केला आहे. अहिराणी ही बोलीभाषा. बोली भाषेमध्ये सुद्धा कसदार साहित्यनिर्मिती

होऊ शकते हे दाखविण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. त्यासाठी पार्श्वभूमी म्हणून लेखकाने अहिराणी भाषेची निर्मिती कशी झाली असावी, याचा अंदाज मांडलेला आहे. आभीर लोकांची ती अहिराणक्ष असा उहापोह करून लेखकाने अहिराणी संस्कृतीचे दर्शन घडविण्यासाठी लोककथा, नीतिकथा, उखाणे, म्हणी, वाक्‌प्रचार, लोकगीते, भारुडे, लावणी, पोवाडा, संतांची गाणी इत्यादींचा समावेश या पुस्तकात केलेला आहे. थोडक्यात हे अहिराणी भाषेतील लोकसाहित्याचे संकलन आहे. त्यामुळे भाषिक स्वरूप, लोकरीती, जीवनपद्धती यांचा काही प्रमाणात ओनामा आलेला आहे.

अहिराणी भाषेचे स्वरूप समजण्यासाठी या पुस्तकाचा उपयोग होत असला तरी, एक गोष्ट स्पष्ट होत नाही; ती म्हणजे 'ठोकळ पुरस्कार' हा ग्रामीण साहित्यासाठी आहे. त्यामध्ये स्वतंत्रपणे ललित साहित्याची निर्मिती अपेक्षित आहे. 'खानदेशी साहित्य सुरभि'मध्ये अहिराणी लोकसाहित्याचे संकलन आहे म्हणजे हे संपादन आहे. स्वतंत्र निर्मिती नाही. तरीही या पुस्तकात हा पुरस्कार कसा दिला गेला, हे कोडे उलगडत नाही.

श्रीराम दुर्गे यांची 'घडई' ही कादंबरी मातंग समाजातील अंधश्रद्धा आणि त्यामुळे एखाद्या प्रगमनशील विचाराच्या माणसाला सहन करावे लागणारे चटके यांचे दर्शन घडविले. यल्लप्पा हा मांग समाजातील आहे. त्याचे वडील पोतराज होते. वार्धक्यामुळे त्यांना पोतराजकी करता येत नाही. तसेच गावकीही करता येत नाही. त्यांचा जीव तिळ तिळ तुटतो. येसकरपाळीमुळे शिळापाका कुटका मिळतो. त्यामुळे पोटाला पुरेसे अन्न मिळते. शिवाय मरिमायचा मान मिळाल्याने बऱ्याचशा वस्तूंमध्ये हिस्सा मिळतो. पण यल्लप्पाला असे लाचार होऊन, चार घरे मागून पोट भरणे आवडत नाही. त्याला वाटते आपण नाही, तरी आपल्या मुलांना चांगले शिकवावे आणि ह्या परंपरेने चालत आलेल्या गावगाड्याच्या घाणीतून बाजूला काढावे. शरद आणि शालीला त्याने शिक्षणही दिले. त्यापायी जातपंचायतीचा बहिष्कारही सहन करावा लागला.

मांग जात म्हणजे दलित. त्यांच्यातील वदफैली, भामीसारख्या स्त्रियांचे वेश्येसारखे वागणे, मांगांच्या उफाड्याला आलेल्या पोरी, तरण्याताठ्या बायका यांचा उपभोग कसा घेतला जात होता, वजनदार माणसे त्यांच्या बायका-पोरींना हक्काच्या मालमत्तेसारखी कशी वापरीत होती; ह्या सर्वांचे चित्रण काही घटनांच्या आधारे लेखकाने केले आहे.

ही कादंबरी मातंग समाजाचे दुःखद जीवनाचे चित्रण करते. ती एक दलित साहित्यकृती म्हणायला हरकत नाही. सिर्वांचा उल्लेख येतो तो केवळ दलित मातंगांच्या दुःखाला उठाव देण्याची पार्श्वभूमी म्हणून. या कादंबरीतील संघर्षसुद्धा दलित विरूद्ध सवर्ण असा प्रकर्षाने येत नाही; तर दलितांमधील संघर्षाचे मध्यवर्ती घटना ठरते. त्यांचे आपापसातील हेवेदावे, त्यांच्या समजुती, श्रद्धा हे सांगता सांगताच लेखक आदर्श विचारांचा प्रचार करीत जातो. दुसरे असे की, पात्रांच्या तोंडची भाषा ही बोलीभाषा समजू शकते. पण निवेदनाची भाषा सुद्धा सदोष वाटली आहे. वाक्यरचना, शुद्धलेखन याकडेही लक्ष दिलेले नाही. ही ग्रामीण कादंबरी नाहीच, पण एक बऱ्यापैकी ललितकृती म्हणूनही ती थिटी पडते.

ठोकळ पुरस्कार हा ग्रामीण साहित्याचा पुरस्कार असताना, १९९६ च्या या पुरस्कारासाठी निखळ ग्रामीण ललित साहित्यकृतीची निवड न करता 'घडई'सारखी दलित कादंबरी आणि 'खानदेशी साहित्य सुरभि'सारखी संपादित साहित्यकृतीची निवड का करावी हे समजत नाही. कदाचित असे असावे, की अन्य कोणतीही ग्रामीण साहित्यकृती या पुरस्कारासाठी आली नसेल आणि पुरस्कार तर 'दिलाच' पाहिजे म्हणूनही या दोन्ही ग्रंथांना १९९६ चा 'ठोकळ पुरस्कार' दिला असला पाहिजे.

श्रीराम दुर्गे यांच्या 'घडई' यासही तो (विभागून) दिला. ग्रामीण साहित्यामध्ये काव्यालाही मोलाचे स्थान आहेच. १९९७ चा पुरस्कार आप्पासाहेब खोत यांच्या 'महापूर' या कथासंग्रहास मिळाला. महापुरासारख्या सर्व बाजूंनी वेढलेल्या प्रतिकूल परिस्थितीतही जगण्याची उमेद बाळगणारे मन आप्पासाहेब खोत यांनी या कथासंग्रहात दाखविले आहे.

लक्ष्मीकांत देशमुख यांच्या 'उदक' या कथासंग्रहास १९९८ चा ठोकळ पुरस्कार मिळाला.

'उदक' याच कथेमध्ये पिण्याच्या पाण्यासाठी दलितांची होणारी वणवण दाखविली आहे. 'उदक' काय किंवा 'पामी-चोटी' या कथा काय, कमी-अधिक फरकाने सबलांकडून दुर्बलांवर होणाऱ्या अन्यायाचे दर्शन आहेत. जगण्यासाठी चुळकाभर पाणी मिळत नाही. ह्या अगतिकतेचा फायदा घेऊन एखादीचे कुवारपणही लुटले जाते. येथे लेखकाला चविष्टपणे वासनेचे वर्णन करायचे नाही तर पाण्यासाठी वासनेला बळी पडलेल्या वास्तवाचे दर्शन घडवायचे आहे.

दुष्काळी भागात पाणी म्हणजे अमृताप्रमाणे कसे दुर्मिळ असते हे लेखकाने वेगवेगळ्या कथांमधून ठसविण्याचा प्रयत्न केला आहे. संपूर्ण प्राप्त जीवनाला पाणी आवश्यकच. तो स्वत:प्रमाणेच इतरांचेही जीव जगविण्यासाठी महत्त्वाचे आहे. मात्र माणुसकीचा पुकारा करणारी थोर माणसं माणुसकीला काळिमा लावतात. सामान्य माणसे मात्र माणुसकीचे पूजन करताना दिसतात. लेखकाने पाणी प्रश्न आणि त्याच्या अनुषंगाने मानवी वर्तनाचे नमुने दाखविले आहेत. 'पाणी चोर' यामध्येही सामान्य माणसाचा उद्वेग दाखविला आहे. समाजातील बडी मंडळीच सरकारी फायदे लाटीत असतात. सामान्यांच्या कल्याणाचा शाब्दिक कळवळा दाखवायचा, फक्त हितसंबंध जोपासून मोठ्यांचीच तळी उचलायची. शिरजोरांनीच स्वत:ची तुंबडी भरावयाची अशी अवस्था कथाकाराने दाखविली आहे. राजकीय नेत्यांच्या वांझ कळवळ्याचा फुगा मांडला आहे. आमदार, खासदार लोकांच्या देण्याकडे लक्ष देत नाहीत हाच आशय येतो.

'लढवय्या' सारख्या कथेत वीरचक्र मिळविलेल्या महादूचा सगळा गांव सत्कार करते. पण पाझर तलावात त्याचीच जमीन घालवून स्वार्थ साधते. त्यातून सरकारी पातळीवर चाललेला भ्रष्टाचार, लाचखोरी यावर प्रकाश टाकला आहे. तर काही कथांमधून पुरुषाची खोटी प्रतिष्ठा, त्याचा बाहेरख्यालीपणा दाखविला आहे.

तानाजी पाटील यांच्या 'रूप-सावली' या कादंबरीस १९९९ चा ठोकळ पुरस्कार मिळाला. या कादंवरीच्या नावातच प्रत्यक्षाचे रूप स्पष्ट होते. सर्व कुटुंबासाठी खस्ता खाणारी लक्ष्मी आणि तिचेच गुण घेऊन नांदायला जाणारी तिची मुलगी लेखकाने उभी केली आहे.

एकत्र कुटुंबपद्धतीमध्ये सर्वांत थोरल्या भावाला आणि त्याच्या बायकोला सर्वांसाठी कसा त्याग

करावा लागतो त्याचे चित्रण करणारी ही कादंबरी. पुढे येणारे भावाभावातील अंतराय आणि विभक्तपणामुळे भोगावे लागणारे हाल हा सर्व भाग याही कादंबरीत आला आहे. हे सर्व नेहमीप्रमाणे असले तरी ह्या कुटुंबाचे सोशीकपण हेच या कादंबरीचे वैशिष्ट्य ठरावे.

पुरस्काराच्या सुरुवातीचा कालखंड ते आतापर्यंतच्या पुस्तकांकडे नजर टाकली तर एक गोष्ट लक्षात येते की, ग्रामीण लोक आता ग्रामीण घटनांची जंत्री देत बोलत नाहीत, तर त्या वास्तवाच्या आधारे ग्रामीण जीवनाच्या अंतरंगाचा शोध घेताना दिसतात. तो ग्रामजीवनाच्या अंत:करणाला हात घालू पाहतो. या दृष्टीने पाहता ग्रामीण साहित्याचा आलेख उर्ध्वगामी आहे असे नक्कीच म्हणता येईल.

❑

डॉ. मिरदेव गायकवाड
३, ओंकार, स्नेहनगर हौसिंग सोसायटी, मार्केट यार्डच्या मागे, पुणे ४११ ०३७.

---

## स्वागत

- ❑ **क. क. कॉम्प्युटरचा :** रवींद्र देसाई, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे २४०
- ❑ **ल्कम्यवितानील :** दि. पु. चिटो, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ८२४
- ❑ **औक्षवंत हो बाळ :** शिवाजी शिंदे, साहित्य कलायात्री प्रकाशन, पुणे. पृष्ठे ५५
- ❑ **ज्ञानदेवांचे सप्तरंग :** प्रा. शिरीष गंधे, ऋचा प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ३८
- ❑ **वेंधळा :** मृणाल जोशी, नीहारा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४
- ❑ **अश्रुत उजळे ज्योत :** मालिनी तुळपुळे, नीहारा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८४
- ❑ **नंदादीप (विकासवार्ता) :** शामसुंदर मुळे, परिमल प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १५१
- ❑ **भारतीय स्वातंत्र्याची ५० वर्षे :** शामसुंदर मुळे, परिमल प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १९३
- ❑ **व्यथाफुल :** प्रमोद कर्नाड, डिंपल पब्लिकेशन, मुंबई, पृष्ठे १९०
- ❑ **वीरशैव व इतर धर्म आणि समाज :** डॉ. सूर्यकांत घुमरे, साधना बुक डेपो, कोल्हापूर, पृष्ठे २७६
- ❑ **दीपस्तंभ :** गिरीजा कीर, दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४९
- ❑ **कुमारांच्या साहसकथा :** गिरीजा कीर, दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५९
- ❑ **कवडसे :** गिरीजा कीर, दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे १०३
- ❑ **कलावंत :** गिरीजा कीर, दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७८

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


महाराष्ट्र साहित्य परिषद

# तुकाराम दर्शन - काही आक्षेप

प्रा. डॉ. यशवंत शंकर साधु

डॉ. सदानंद मोरे यांच्या 'तुकाराम दर्शन' हा ग्रंथ संतश्रेष्ठ तुकाराम महाराज यांचे सर्वांगीण दर्शन घडवणारा पहिलाच ग्रंथ आहे. तुकारामकालीन परिवेक्ष्यातून तुकोवा कसे दिसतात, आजच्या परिवेक्ष्यातून तुकोवांचे दर्शन कसे होऊ शकेल याचे डॉ. सदानंद मोरे यांनी साक्षेपी विवेचन केले आहे. विशेषतः तुकोवा आणि देहू येथील मोरे घराण्याची परंपरा. तुकोवा आणि देहूचे देवस्थान. तुकोवांशी संवंधित अनेक ऐतिहासिक, राजकीय व्यक्ती या संवंधीची डॉ. मोरे यांनी दिलेली माहिती ज्ञानवर्धक आहे. आजची मराठी कविता, कादंबरी, चित्रपट इ. माध्यमातून तुकोवांचे दर्शन कशा प्रकारे घडते याचे डॉ. मोरे यांनी केलेले विवेचन मर्मग्राही आहे. ऐतिहासिक व भौगोलिक असा फार मोठा परीघ लक्षात घेऊन डॉ. मोरे यांनी तुकोबांचे दर्शन घडवले, त्यावद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. तथापि प्रस्तुत ग्रंथातील काही विवेचनाबद्दल माझे काही आक्षेप आहेत, ते याठिकाणी नोंदवत आहे.

१) 'तुकाराम दर्शन'ची मांडणी डॉ. मोरे यांनी एका विशिष्ट सामाजिक-सांस्कृतिक संदर्भात केली आहे. त्या मांडणीचा एक संदर्भ असा की, गेल्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत तुकाराम दर्शन स्वायत्त असल्याने अबाधित होते. परंतु त्यानंतरच्या काळात 'वारकरी संप्रदायाशी मुळात संबंध नसलेली काही मंडळी त्यात घुसून गीताभागवताला व ज्ञानेश्वरी-गाथेला वेदोपनिषदांच्या चौकटीत वसविण्याचा निकराचा प्रयत्न करून संप्रदायाचे स्वरूपच विघडवीत आहेत. खरे तर त्यांनी ते बरेचसे विघडविलेले आहे, असे म्हटले तरी चालेल. आता प्रत्यक्ष उपनिषदांचा ब्रह्मसूत्राचा व त्यांच्या वरील वेगवेगळ्या आचार्यांच्या भाष्यांचा अभ्यास करणे हीही काही सोपी बाब नाही. त्यावर पर्याय म्हणून या मंडळींनी विचार सागर, वृत्ती प्रभाकर असे प्राकृत किंवा पंचदशीसारखे संस्कृत ग्रंथ अभ्यासण्याची पद्धत सुरू केली. या अर्ध्या हळकुंडाने पिवळया झालेल्या मंडळींनी आपण अतिशय विद्वान असल्याचा आभास खेड्यापाड्यातील भाबड्या वारकऱ्यांच्यात निर्माण केला. अशा काही मंडळींच्या कीर्तन-प्रवचनांमधून न्याय, व्याकरण, घटपटादी चर्चा यांची रेलचेल असते. पण तिचा संतवाङ्मयाशी नेमका संबंध काय हे त्यांचे त्यांनाही माहित नसते. ही एक प्रकारची उच्चस्तरीय पोपटपंचीच म्हणायची. एका बाजूला वेदांत सांगताना जग माया आहे, असे म्हणायचे आणि दुसऱ्या बाजूला जास्तीत जास्त माया कशी जमवता येईल, हे पाहावयाचे. (तुकाराम दर्शन पृ. ९५)

डॉ. मोरे यांनी वरील परिच्छेदात जी विधाने केली आहेत, ती कोणत्या मंडळीवद्दल आहेत याचा खुलासा केलेला नाही. वारकरी संप्रदायाशी मुळात संबंध नसलेल्या काही मंडळींनी या संप्रदायात घुसून वारकऱ्यांची ही स्वायत्तता चालू शतकात नष्ट केली आहे, एवढेच डॉ. मोरे

यांनी म्हटले आहे. पण यातील 'काही मंडळी' म्हणजे कोण याचा खुलासा डॉ. मोरे यांनी केला नाही. तरी पण या ठिकाणी एक अंदाज असा करता येतो, की आळंदी, पंढरपूर येथे आश्रम पद्धतीने वारकरी शिक्षणसंस्थांतून जे अध्ययन-अध्यापन होते, त्यात संतवाङ्मयाच्या अभ्यासास काही वेदांतग्रंथांची जोड दिली जाते. पंढरपूर, आळंदी येथील काही मठांतून चातुर्मास्यात काही वेदांतग्रंथांचे अध्ययन-अध्यापन चालते, त्यावर डॉ. मोरे यांचा रोख असावा. वेदांताची जोड देऊन संत साहित्याचा अभ्यास करण्याची पद्धती चालू शतकातच सुरू झाली असे नाही तर मुळातच संतांच्या तत्त्वज्ञानास वेदांताची बैठक आहे. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव या ग्रंथांत वेदांताची परिभाषा योजून अनेक ठिकाणी निरुपण आले आहे. विशेषत: अमृतानुभवाच्या प्रकरणांची नुसती नावे जरी पाहिली तरी त्यात वेदांतातील प्रमुख संकल्पना आढळतात. शब्दखंडन, अज्ञानखंडन, ज्ञानखंडन, जीवन्मुक्तदशाकथन इत्यादी नावावरूनच त्यातील वेदांताच्या परिभाषेची कल्पना येते. ज्ञानेश्वरीतील तेराव्या, चौदाव्या, पंधराव्या अध्यायात निखळ वेदांत विषय आला आहे. संत एकनाथ महाराज तर रुक्मिणी स्वयंवराची कथा सांगत असले तरी त्यात वेदांताचे रुपक आणतातच. भावार्थ रामायणातील असा एकही अभ्यास नाही, की ज्यात नाथांनी वेदांताचे रूपक आणले नाही. एकनाथाचे चतु:श्लोकी भागवत हस्तमलक हे ग्रंथ वेदांतपरच आहेत. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज यांनी देखील 'माया, ब्रह्म' याचे निरुपण केलेच नाही, असे म्हणता येणार नाही.

'माया तेचि ब्रह्मतेचि माया ।
अंग आणि छाया जयापरी ॥
तोहिता न तुटे सारिता निराळी ।
लोटांगण तळी हारपती ॥
दुजे नाही तेथे बळ कोणासाठी ।
आणिक ते आटी विचाराची ॥
तुका म्हणे उंच वाढे उंचपणे ।
ठेंगणी लवणे जेती तेसी ॥ (तु. गा. भाष्य अ. क्र. ४०)

ज्यांना वेदांताची परिभाषा माहित नाही, त्यांना वरील अभंगाचे आकलन तरी होईल काय? सारांश, ज्ञानेश्वरी - गाथेला काही मंडळींनी वेदोपनिषदाच्या चौकटीत बसविण्याचा निकराचा प्रयत्न केला हे जे डॉ. मोरे यांचे विधान आहे, ते वस्तुस्थितीला धरून नाही. वस्तुस्थिती अशी आहे, की ज्ञानेश्वरी असो की एकनाथी भागवत असो किंवा तुकोबांची गाथा असो त्यातील तत्त्वनिरुपणासाठी वेदांतग्रंथ, उपनिषदे, भाष्यग्रंथ यांची पूर्वतयारी आवश्यकच आहे. ही पूर्वतयारी मूळ संस्कृत ग्रंथाच्या आधारे करणे वारकरी विद्यार्थ्यास अशक्य असते. म्हणून प्रारंभीच्या काळात 'विचार सागर', 'वृत्तिप्रभाकर' या सारखे प्राकृत ग्रंथ शिकविण्याचा परिपाठ वारकरी शिक्षणसंस्थांतून चालू असतो. त्यात वावगे काय आहे, हेच समजत नाही.

जे लोक संतसाहित्याचा काव्य म्हणून अभ्यास करतात. ते लोक काव्य समीक्षेची भाषा योजून संतसाहित्याचा अभ्यास करतात. तेथे समीक्षेतील परिभाषेचा संतसाहित्याशी संबंध काय असा प्रश्न निर्माण होत नाही. जे लोक भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून संताच्या साहित्याचा अभ्यास करतात, तेव्हा भाषाशास्त्रीय निकष वापरण्यावर कोणाचा आक्षेप नसतो. समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून संतसाहित्याकडे पाहिले जाते तेव्हा तर प्रतिगामी-पुरोगामी अशा विचारस्रोतात संतांच्या कार्याचे परीक्षण केले जाते. त्यावेळी संतसाहित्याशी त्या विचारप्रवाहाचा कितपत संबंध आहे, असा प्रश्न निर्माण होत नाही. संतसाहित्यातील तत्त्वनिरुपणाचा अभ्यास करताना भारतीय तत्त्वज्ञान परंपरांचा आधार घेतल्यास त्यात डॉ. मोरे यांना गौण वाटण्याचे कारणच काय? विचार सागर, वृतिप्रभाकर हे ग्रंथ संस्कृत वेदांत ग्रंथांचे पर्याय नसून प्राथमिक ग्रंथ म्हणून वापरले जातात. कारण पंढरपूर, आळंदी येथे वारकरी संतांच्या साहित्याचे अध्ययन करणारा बराच मोठा वर्ग ग्रामीण भागातला व बहुजनसमाजातला असतो. त्यांचे शालेय शिक्षण फार तर मॅट्रिकपर्यंत झालेले असते. संस्कृतचा गंधही नसतो अशा अवस्थेत त्या विद्यार्थ्यांना ज्ञानेश्वरी, गाथा, भागवत, अमृतानुभव अभ्यासण्यासाठी पूर्वतयारी म्हणून 'विचारसागर, वृत्तिप्रभाकर इ. ग्रंथ शिकवण्याची पद्धत आहे. या ग्रंथांच्या समकक्ष ज्ञानेश्वरी, अमृतानुभव यातील वेदांतप्रक्रिया शिकविल्या जातात. सारांश, ज्ञानेश्वरी — गाथा इ. ग्रंथांना वेदोपनिषदांच्या चौकटीत बसविण्याचा निकराचा प्रयत्न काही मंडळींनी केला व वारकरी संप्रदायाचे स्वरूप विघडवून टाकले असे जे डॉ. मोरे यांचे म्हणणे आहे, ते वस्तुस्थितीचा विपर्यास करणारे आहे. त्यामुळे वारकरी संप्रदायाशी मुळात संबंध नसलेली काही मंडळी या संप्रदायात घुसून या संप्रदायाचे स्वरूप विघडवीत आहेत हे डॉ. मोरे यांचे म्हणणे मुळीच मान्य होणारे नाही.

वारकरी संप्रदायाशी मुळात संबंध असणे आणि नसणे म्हणजे काय? जो कुणी गळ्यात तुळशीची माळ घालतो, पंढरीची निष्ठेने वारी करतो आणि आपले जीवन सदाचाराने व्यतीत करतो तो वारकरी.

'होय होय वारकरी । पाहे पाहे रे पंढरी ।<br>
असे तुकोबांनी तमाम लोकांना आवाहन केले आहे.<br>
'यारे यारे लहान थोर । या ती भलते नारी नर ।<br>
करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥'

असे तुकोबांनी सर्वांनाच या संप्रदायात पाचारण केले आहे. संताच्या या आवाहनाला प्रतिसाद म्हणून अनेक जण वारकरी संप्रदायात आले. आपले पंथीय, जातीय, सैद्धांतिक अहंकार विसरून अनेक जण या संप्रदायात आले, त्यांना डॉ. मोरे मुळात संबंध नसणारे मंडळी म्हणत असतील तर संतांच्या आवाहनाला काही अर्थ नाही असे म्हणावे लागेल. चालू शतकात या वारकरी संप्रदायात काही मंडळींनी घुसून संप्रदाया विघडविला असे जे डॉ. मोरे

यांचे म्हणणे आहे, ते इतिहासाला धरून नाही. कारण इतिहासात असे दिसते की श्री सखाराम महाराज अमळनेरकर (इ. स. १६४९ ते १७४०) हे मुळात रामानंद संप्रदायाचे होते. पण नंतर ते पंढरीचे वारकरी झाले. बेलापूरकर फडाचे मूळ पुरुष शाहुबादादा बेलापूरकर हे ब्राह्मण असून वारकऱ्यांच्या संगतीत आले आणि निष्ठावान वारकरी झाले. त्यांनी सराफीचा व्यवसाय सोडला व ते वारकरी बनले. हे सर्व जण वारकरी संप्रदायातील प्रतिष्ठित फडकरी व दिंडीवाले आहेत. हैबतरावबाबांचे समकालीन बाबासाहेब आजरेकर हे देखील वारकऱ्यांच्या संगतीत एकनिष्ठ वारकरी बनले. या पद्धतीने वारकरी संप्रदाय विशाल बनला. त्यात कुणीही घुसण्याचा प्रश्न नाही. प्रत्येकास वारकरी संप्रदायात येण्याचा अधिकार आहे. हा संप्रदाय म्हणजे कुणाची मक्तेदारी नाही. संतांनी सुरू केलेले हे अन्नछत्र व पाणपोई त्याचा लाभ कुणीही घेऊ शकतो. म्हणून वारकरी संप्रदायात कुणी संबंध नसताना घुसले हे डॉ. मोरे यांचे म्हणणे वारकरी संप्रदायाच्या मूळ प्रकृतीवरच आघात करणारे आहे. अठराव्या शतकापासूनच या संप्रदायात विविध पंथ, सिद्धांत, संप्रदाय यांचे अहंकार विसर्जित करून अनेक मंडळी या संप्रदायात आली आणि या संप्रदायाचे ऐश्वर्य अनेक अंगांनी वाढले. बेलापूरकर, टेंभेकर आदींनी वारकरी संप्रदायाची भजनी परंपरा विकसित केली. वासकर, देहूकर, आजरेकर यांनी या संप्रदायाची कीर्तन परंपरा वाढविली. जोग, साखरे यांनी या संप्रदायाची अध्ययन-अध्यापन परंपरा विकसित केली. अनेक फडकरी दिंडीसंचालक वारकरी संप्रदायाचे अस्तित्व आजही जिवंत ठेवतात. आज इतकी वर्षे लोटली पण कोणत्याही राजकीय पक्षाचा अभिनिवेश या संप्रदायात शिरला नाही. कोणत्याही जातीय संघटनेच्या आहारी हा संप्रदाय गेला नाही. कोणत्याही सामाजिक झुंडशाहीचे प्रतिनिधित्व या संप्रदायाने केले नाही. कोणत्याही शासकीय मदतीच्या अभिलाषेपोटी ही चळवळ चालवली जात नाही. अर्थात कोणत्याही राजकीय, धार्मिक, सामाजिक विचारसरणीचे लोक वारकरी असू शकतात, पण ते वैचारिक अभिनिवेश पंढरीच्या वाळवंटात विसरले जातात, हीच या संप्रदायाची खरी स्वायत्तता आहे. या संप्रदायात ब्राह्मण आहेत म्हणून ब्राह्मणांचे वर्चस्व आहे, असे उदाहरण दाखवून देता येणार नाही. या संप्रदायात मराठे आहेत म्हणून त्यांचे प्राबल्य येथे आढळणार नाही. या संप्रदायात अन्य जाती-जमातीचे लोक आहेत, म्हणून त्यांना कुणीही हीन लेखले नाही. संतांच्या पादुकेजवळ सर्वजण सारखे व एकच आहेत, असा येथील शिरस्ता आहे. पंढरपूर, आळंदी येथे प्रत्येक जातीच्या धर्मशाळा व मठ आहेत. पण त्यात कुणाचे कुणाशी भांडण नाही. वारीचे चार-पाच दिवस सर्वजण मिळून-मिसळून राहतात व परमार्थाचा आनंद लुटतात, ही वारकऱ्यांची अबाधित स्वायत्तता कुणीही बिघडवू शकत नाही व कुणात ते सामर्थ्यही नाही. डॉ. मोरे यांना वारकरी संप्रदायाची अबाधित स्वायत्तता काही मंडळींनी बिघडविली असे जे वाटते ते कशाच्या आधारावर?

'अर्ध्या हळकुंडाने पिवळ्या झालेल्या मंडळींनी आपण विद्वान असल्याचा आभास खेड्यापाड्यातील भावड्या वारकऱ्यांच्यात निर्माण केला, पण प्रत्यक्षात संस्कृत विद्वानांची परिषद भरली तर त्यांना कोणी आडवे पानही देणार नाही. त्यामुळे संस्कृत पंडितांत वारकऱ्यांचे नेते म्हणून मिरवायचे तर मराठमोळ्या वारकऱ्यांच्यात संस्कृत पंडित म्हणून भाव मारायचा

अशी दुहेरी चाल ही मंडळी चालतात, हा डॉ. मोरे यांचा उल्लेख कुणाला उद्देशून आहे. त्याचा येथे बोध होत नाही. पण त्यांचे वरील विधान वारकरी संप्रदायाचे बौद्धिक नेतृत्व करणाऱ्या सर्व व्यक्तींबद्दल असेल तर मात्र आक्षेपार्ह आहे. कारण वारकरी संप्रदायात ज्यांना संस्कृतचे विद्वान म्हणता येतील, अशा व्यक्ती होऊन गेल्या. शंकरमहाराज खंदारकर, धुंडामहाराज देगलूरकर, एकनाथमहाराज देगलूरकर हे केवळ वारकरीच नव्हते, तर संस्कृत ग्रंथांचे गाढे अभ्यासक होते. प्रसंग पडल्यास संस्कृतमधूनही ते शास्त्रीय प्रतिवाद करू शकत असत. काशीच्या राजेश्वरशास्त्री द्रविडांनी देखील शंकरमहाराज खंदारकर यांना त्यांच्या विद्वत्तेबद्दल प्रशस्तीपत्र दिले आहे. या मंडळींना अर्ध्या हळकुंडाने पिवळी झालेली मंडळी असे जर डॉ. मोरे यांना म्हणावयाचे असेल तर तो केवळ दुराग्रह ठरेल. शंकरमहाराज खंदारकर हे तर महाराष्ट्रातील खेड्यापाड्यातील एक लोकप्रिय प्रवचनकार व कीर्तनकार होते. कार्तिकी वारीत चंद्रभागेच्या वाळवंटावर त्यांच्या हरिकीर्तनास जेवढा जनसमुदाय जमत असे, तेवढा समुदाय एकाच्याही कीर्तनाला जमत नसे. याचा अर्थ असा की, वारकरी संप्रदायास भूषण ठरणारे अनेक संस्कृत विद्वानही या संप्रदायात होते. त्यांनी खेड्यापाड्यातील वारकऱ्यांचे प्रबोधन करून वारकरी संप्रदाय वृद्धिंगत केला. आपली सर्व विद्वत्ता वारकरी संप्रदायाच्या प्रस्थानत्रयीच्या भाष्यासाठी खर्च करणारे शंकरमहाराज खंदारकर हे एकमेव उदाहरण आहे. ज्ञानेश्वरी — एकनाथ भागवत — गाथा या तीनही ग्रंथावर त्यांनी भाष्य लिहिले, जे वारकरी जगतात अतिशय लोकप्रिय आहेत. खेड्यापाड्यातील समाज हा भावडा व वेडा असतो व त्यास कुणीही मूर्ख बनवू शकतो, असे समजणे चुकीचे आहे. उलट खेड्यात पसरलेल्या अफाट भारतीय जनतेनेच मतपेटीच्या आधारे राजकारणी लोकांचे अचूक मूल्यमापन केले आहे. परमार्थाच्या क्षेत्रातही लोक अचूक मूल्यमापन करूनच व्यक्तींचा स्वीकार करतात. काही व्यक्तींचा वेदांतग्रंथांचा अभ्यास अपुरा असेल तर ती बाब वैयक्तिक आहे. काही लोक द्रव्यार्जनासाठी व प्रचंड पैसा मिळविण्यासाठी कीर्तने-प्रवचने करीत असतील तर तो त्या व्यक्तीचा प्रश्न आहे. ढोंग, दंभ, गुरुबाजी, स्वार्थ इत्यादी गोष्टींना लोक चांगल्याप्रकारे ओळखतात. लोकच अशा व्यक्तींना बाजूला ठेवतात. पण त्यांच्यामुळे संप्रदायाचे स्वरूपच बिघडते हे म्हणणे चूक आहे.

२) 'अपहरण आणि सत्वहरण' या प्रकरणात डॉ. मोरे यांनी म्हटले आहे, की 'तुकोबांच्या पश्चात बहिणाबाईंना महत्त्व न दिले जाण्याचे कारण बाईंची परखड ब्राह्मण्यचिकित्सा' हेच आहे. तुकोबांनंतर बहिणाबाईंचे नाव जवळजवळ पुसून टाकून त्यांच्या ऐवजी जे बहिणाबाईंची आरती गातात, त्या निळोबाराय पिंपळनेरकर यांना महत्त्व देणे हा अपहरणाचाच एक भाग आहे... बहिणाबाईंचे नाव पुसले जाऊन त्यांच्याऐवजी निळोबांची प्रस्थापना होते, याचा अर्थच मुळी सामाजिक दृष्ट्या बहिणाबाईंची मते अडचणीची वाटणाऱ्यांनी निळोबांना महत्त्व देणे सुरू केले. निळोबांचे उत्तराधिकारी मानले जाणारे शंकरस्वामी सिउरकर हे बहिणाबाईंच्याच सिउर या गावचे होते. या बाबीकडे केवळ योगायोग म्हणून दुर्लक्ष करता येण्यासारखे नाही. गावातल्या गावातील एवढ्या थोर अधिकारसंपन्न स्त्रीचा वारसा अभिमानाने सांगण्याऐवजी

शंकरस्वामींना निळोबांचा आश्रय घ्यावासा वाटतो, हे तसे अस्वाभाविकच म्हणायला हवे. (तुकारामदर्शन पृ. ३९३)

डॉ. मोरे यांच्या वरील परिच्छेदातील विधानांची दोन भागात चर्चा होऊ शकेल. त्यापैकी पहिला भाग म्हणजे संत कवयित्री वहिणाबाई यांनी वज्रसूचिकोपनिषदाचा मराठी अभंगानुवाद केला आहे. त्यात ब्राह्मण कोण? याची चिकित्सा केली आहे. डॉ. मोरे यांच्या मते संत वहिणाबाईंनी बौद्धपरंपरेतील वज्रसूचीचे रूपांतर करून ब्राह्मण्याचा उच्छेद केला असून परंपरेची अंत:समीक्षा पराकोटीला नेली आणि वारकरी विचारामधली ही धारदार प्रवृत्ती थोपविण्याचे काम अपहरणकर्त्यांनी केले त्याचाच एक भाग म्हणजे तुकोबांच्या पश्चात वहिणाबाईंचे नाव पुसून टाकले गेले व निळोबांना महत्त्व दिले गेले. ब्राह्मणांच्या ब्राह्मण्यांची चिकित्सा वहिणाबाईंच्याही अगोदर संत एकनाथ महाराजांनी अतिशय परखड शब्दांत भारुडाच्या माध्यमातून केली.

'आम्ही ब्राह्मण म्हणती । स्नान संध्या वेदपठण न करिती ।

अशौच धर्म जारण मारण जपती । मोहन स्तंभनादिक की जी मायवाप ।'(जोहार)

गाव पातळीवर ज्याठिकाणी ब्राह्मण कामगारांनी सारी व्यवस्था उद्ध्वस्त केली आहे, त्याचे दारुण चित्र एकनाथांनी उभे केले आहे —

'दंभाजी शेटे । कामाजीराव महाजन । मनाजीराव देशमुख । ममताई देशमुखीण । रसानाईक पाटलीण । केसाजीपंत कुलकर्णी । जराजीराव देशपांडे । हे फार हरामजादे आहेत । कचेरीत जोम धरून वसतात । सरकारचे काम होऊ देत नाहीत. (अर्जदस्त)

वरील रूपकातून नाथांनी अप्रत्यक्षपणे ब्राह्मणांच्या अध:पतनाचेच चित्र रेखाटले आहे. शब्दज्ञानी व अनुभवशून्य ब्राह्मणाचे चित्र 'ऐक रे ब्राह्मणाच्या कारट्या । वलवल करू नको पोरट्या । बोलणे अवघे बोखट्या । हित नाही ॥ अपुले ते हित पाही । वेदशास्त्री काही नाही। पुराणे पढोनि केले काई । हित नाही.' (पोर) या शब्दात रेखाटले आहे.

एकनाथांचा 'हिंदू तुर्क संवाद' हा खरे म्हणजे 'ब्राह्मण तुर्क संवाद' आहे. त्याद्वारे तुर्कांच्या माध्यमातून नाथांनी ब्राह्मणांची जी निर्भत्सना केली आहे, तशी त्या काळात इतरत्र कुठेही आढळणार नाही. या संवादाचे रूपांतर शेवटी हिंदू व मुसलमानांचा देव एकच आहे, या सिद्धांतात नाथांनी केले. ही नाथांची व्यापक दृष्टी आहे तो भाग वेगळा केल्यास येथे ब्राह्मणांच्या सर्व आचार-विचारांची यथेच्छ टिंगल केली आहे. स्वत: एकनाथ हे वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण होते. तरीपण नाथांनी त्यावेळच्या ब्राह्मणांचे ब्राह्मण्य ओरवाडून काढले. ब्राह्मणांच्या कर्मठपणावर नाथांनी डौर या भारुडात थोडेसे अश्लील शब्दात पण वस्तुस्थितीला धरून निरुपण केले आहे.

'उठूनिया ब्रह्ममूर्ती । काय करावे निश्चिती । ते ऐका तुम्हाप्रती । यथा निगुती सांगेन । डौरनाद। खुडमुड । कर्ममार्गी स्मृती गृहीतशिश्नश्चोत्थाय जगाम दिशउत्तरम्

कर्ममार्गी विधिती । शिश्न धरुनि डावे हाती । दुर्वा घेऊनि उजवे हाती । उत्तर दिशेप्रती । हागा जावे ॥ ऐसे मुहूर्तीच हागो लागले । ते हागणवटीसी अडकले ॥ (डौर)

श्रुती-स्मृतीचा आधार घेऊन कर्मठपणाचा वडेजाव माजविणाऱ्या ब्राह्मणांची नाथांनी येथे

विटंबना केली आहे. मग प्रश्न असा निर्माण होतो, की डॉ. मोरे म्हणतात, त्याप्रमाणे संत एकनाथांना अपहरणकर्त्यांनी का पुसून टाकले नाही. ब्राह्मण्याच्या नावाखाली जे जे लोक समाजात ढोंग, अधर्म, पाप निर्माण करतात, अशावर सर्वच संतांनी टीकास्त्र सोडले आहे. तुकाराममहाराजांनी देखील ब्राह्मण्याची चिकित्सा केली आहे. पण डॉ. मोरे यांना असे वाटते, की संत वहिणाबाई यांनी वज्रसूचीचे मराठीत रूपांतर केले ते ब्राह्मण्यउच्छेदक असल्यामुळे ब्राह्मणांना ते अडचणीचे वाटून त्यांनी बहिणाबाईंचे नावच पुसून टाकले. मग हीच घटना संत एकनाथांच्या बाबतीतही का घडली नाही? ब्राह्मणांची व्याख्याच एकनाथांनी पुढील एका अभंगाच केली आहे —

'ब्रह्म जाणे ब्राह्मण याती । त्याची घडावी संगती । ब्राह्मण तयासी म्हणावे । त्याची पायी लीन व्हावे ॥ गळा घालोनि सुत्रदोरी । म्हणविती ब्रह्मचारी ॥ परिब्रह्म नाही ठावे । लोक सांगतसे भावे । एका जनार्दनी पूर्ण । ब्रह्म जाणे तो ब्राह्मण ॥

एकनाथांचे हे ब्राह्मणनिरुपण त्यावेळच्या अपहरणकर्त्यांना अडचणीचे नक्कीच वाटले असेल. संत वहिणाबाई यांनीच अंत:समीक्षा पराकोटीला नेली, हे डॉ. मोरे यांचे म्हणणे खोटे आहे. त्याहीपूर्वी संत एकनाथांनी ही अंत:समीक्षा पराकोटीला नेली होती. मग एकनाथांचे नाव का पुसले गेले नाही. याला डॉ. मोरे यांचेकडे कोणते उत्तर आहे? त्यातील खरी वस्तुस्थिती अशी आहे, की त्या त्या काळी ब्राह्मणांचे जे नैतिक अध:पतन झाले, त्यावद्दलचा राग सर्वच संतांनी व्यक्त केला आहे. तसाच तो वहिणाबाई यांनीही व्यक्त केला आहे. त्यास बौद्ध वज्रसूचीचा कितपत आधार आहे, हा एक वेगळा मुद्दा आहे. पण बहिणाबाई यांनी जशी ब्राह्मण्याची चिकित्सा केली, तशीच पूर्वी तुकोवांनी, नाथांनी केली. संतनामदेवाच्या तीर्थावळीत तर ज्ञानशून्य, भक्तिशून्य ब्राह्मण्याचे स्तोम प्रत्यक्ष कथानकातून उघडे पाडले आहे. पण याचा अर्थ संतांना ब्राह्मण जातीवद्दल अनादर होता, असे म्हणता येत नाही. ब्राह्मणांचे सोवळे ओवळे, त्यांचा शुद्ध आचार, त्यांची उपासना, त्यांची वेदनिष्ठा यावद्दल सर्व संतांनी आदराचे उद्‌गार काढले आहेत. संतांना जातीभेद मान्य नव्हते, संतांना वर्णव्यवस्था समूळ नष्ट करावयाची होती, असे मुळीच नाही. उलट संतांनी प्रत्येक वर्णाचे गुण स्वभाव यांचे प्रसंगोपात्त विवेचन केले आहे. या संदर्भात तुकोबांचा एकच अभंग पुरेसा आहे. खालील अभंगाची पार्श्वभूमी अशी, की — एका विद्वान पवित्र ब्राह्मणाने आपल्या घरी तुकाराममहाराजांना जेवावयास वोलावले. अर्थात तुकोवांचा अधिकार जाणून त्याने महाराजांचे पात्र ब्राह्मणांच्या पंक्तीतच मांडले हे पाहून तुकोबा म्हणाले —

'नये माझा तुम्हा होऊ शब्दस्पर्श । विप्र तुम्ही विद्वांस ब्राह्मणांसी ॥ म्हणोनिया तुम्हा करितो विनंती । द्यावे शेष हाती उरले ते ॥ वेदी कर्म जैसे वोलिले विहित । करावी ते नीत विचारुनी ॥ तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका म्हणे ॥

अभंगाचे स्पष्टीकरण करण्याची गरजच नाही. इतका त्यातील भाव स्वच्छ व स्पष्ट आहे. तुकोवा ब्रह्मनिष्ठ होते, तरी पण वर्णाश्रमधर्माची मर्यादा उल्लंघन करावी, असे त्यांना मुळीच वाटत नसे, हे वरील उद्‌गारावरून दिसून येईल.

डॉ. मोरे यांना हा अभंग सर्व गाथा प्रतीत आढळेल. जोग प्रतीत पृ. २६० वर हा अभंग क्र. २९७६ प्रमाणे, तसेच प्र. न. जोशी सार्थ गाथेत पृ. ३५० वर हा अभंग ३८५८ क्रमांकानुसार आणि सकलसंतगाथेत पृ. २६७ वर ३००६ क्रमांकावर हा अभंग आढळेल. डॉ. मोरे यांना जी प्रत प्रमाण वाटेल त्यात त्यांनी हा अभंग व त्याचा अर्थ पाहण्यास हरकत नाही. संतांची ब्राह्मण्यचिकित्सा व ब्राह्मणांविषयी आदराचे उद्‌गार या दोन्ही बाजू लक्षात घेऊनच संतांच्या ब्राह्मण्यविरोधाचा विचार केला पाहिजे. चालू शतकात वारकरी संप्रदायाचे ब्राह्मणीकरण केले असे जे म्हटले जाते, ते पूर्णपणे चुकीचे आहे. जातीभेदाचे उच्चाटन, वर्णव्यवस्थेचे उच्चाटन, वेदोपनिषदांची चौकट अमान्य करणे हे संतांना अपेक्षित होते, हे गृहीत धरून जी ब्राह्मणीकरणाची कल्पना मांडली जाते, ती आजच्या सेक्यूलर स्टेटमध्ये उपयुक्त असली तरी संतांना कितपत मान्य होती, याचा विचार झाला पाहिजे. म्हणूनच वारकरी विचारांमधील धारदार प्रवृत्ती थोपविण्यासाठी अपहरकर्त्यांनी बहिणाबाईंचे नाव अडचणीचे म्हणून पुसून टाकले व निळोबांचे महत्त्व वाढविले हे डॉ. मोरे यांचे म्हणणे टिकणारे नाही.

डॉ. मोरे यांच्या वरील विधानाचा दुसरा भाग म्हणजे शंकरस्वामी सिउरकर हे बहिणाबाईंच्या सिउर या गावचे असून त्यांनी बहिणाबाईंचा अनुग्रह घेण्याऐवजी निळोबाराय पिंपळनेरकर यांचा अनुग्रह घेतला आणि निळोबापासून वारकरी संप्रदायाची वाढ होत गेली, ह्यात डॉ. मोरे यांना वारकरी संप्रदायाचे सत्त्वहरण झाले असे वाटते. 'बहिणाबाई ऐवजी निळोबांचे नाव पुढे आल्यामुळे एका बाजूने अंत:समीक्षेचे अपहरण होणे तर सुलभ झाले. हे अपहरण म्हणजे संप्रदायाचे सत्त्वहरण झाले' असे डॉ. मोरे यांना वाटते.

डॉ. मोरे यांचे वरील विधान पूर्णपणे अनैतिहासिक आहे. कारण संत बहिणाबाई व निळोबाराय यांच्यातील ऐतिहासिक संबंध पाहिल्यास असे लक्षात येते, की संत बहिणाबाई या इ. स. १७०० मध्ये समाधिस्त झाल्या. तोपर्यंत निळोबारायांचा किंवा शंकरस्वामी सिउरकर यांचा परमार्थाच्या पृष्ठभूमीवर उदय सुद्धा झाला नव्हता. कारण निळोबांचा जन्मच इ. स. १६७६ मध्ये झाला. बालपण, अध्ययन, विवाह, व्यवसाय यात ३० वर्षे घालवल्यानंतर इ. स. १७०६ मध्ये निळोबांनी आपल्या कुलकर्णीपदाचा राजिनामा दिला आणि ते शिरूर घोडनदी हे आपले राहाते गाव सोडून सर्वसंगपरित्याग करून पारनेरला आले. पंढरपूर, आळंदी, देहू ही क्षेत्रे अवलोकन करीत असता इ. स. १७१० मध्ये त्यांची देहूच्या नारायणबुवांशी भेट झाली. त्या भेटीतच निळोबांना तुकोबांच्या चरित्रश्रवणाचा योग आला. तेथूनच त्यांच्या परमार्थास खरी सुरुवात झाली. तेव्हापासूनच ते पंढरीचे निष्ठावान वारकरी बनले. इ. स. १७१२ मध्ये त्यांना तुकोबांचा अनुग्रह लाभला. निळोबा एक संतकवी म्हणून तेव्हापासूनच प्रसिद्ध झाले. एकूण हा कालक्रम लक्षात घेतल्यास निळोबांच्या चरित्रातील सर्व महत्त्वाच्या घटना बहिणाबाईंच्या निर्याणानंतर घडतात. शंकरस्वामी सिउरकर यांचा निश्चित कालखंड माहित नाही. शंकरस्वामी निळोबा सोबत आळंदी, पंढरपूरास जात असत आणि त्याच सुमारास शंकरस्वामींना निळोबांचा अनुग्रह मिळाला म्हणजे शंकरस्वामी सिउरकरांनी निळोबांकडून अनुग्रह घेतला ही घटना १७१२ पूर्वी घडणे शक्य नाही. कारण निळोबांना

तुकोबांचा अनुग्रह इ. इ. १७१२ मध्ये प्राप्त झाला. वरील सर्व घटनांचा क्रम लक्षात घेतल्यास संत बहिणाबाईंच्या निर्याणानंतर निळोबांचे चरित्र फुलण्यास सुरुवात होते आणि त्याच वातावरणात शंकरस्वामी यांची निळोबांची भेट सहवास होऊन त्यांना निळोबांचा अनुग्रह प्राप्त झाला. येथे संत बहिणाबाईंचा संबंधच कुठे येतो? शंकरस्वामी हे बहिणाबाई यांच्या सहवासात आले तरीपण त्यांनी बहिणाबाईंच्या अनुग्रह न घेता निळोबांचा अनुग्रह घेतला असे घडले असते तर मात्र डॉ. मोरे म्हणतात, त्याप्रमाणे वारकरी संप्रदायाचे सत्त्वहरण झाले असते. पण तसे काही घडल्याचे डॉ. मोरे यांना पुराव्यानिशी दाखवता आले नाही. म्हणून बहिणाबाई यांचे नाव पुसून टाकून अपहरणकर्त्यांनी निळोबांचे नाव पुढे आणले हे डॉ. मोरे यांचे म्हणणे ऐतिहासिकदृष्ट्या मुळीच टिकणारे नाही.

निळोबाराय यांना कुणीही महत्त्व देण्याचे कारण नव्हते. कारण त्यांचा मोठेपणा स्वत:सिद्ध होता, हे त्यांच्या अभंगवाणीने व कार्याने इतिहासात सिद्ध झाले आहे. बहिणाबाई यांना तुकोबाचा अनुग्रह कार्तिक वद्य पंचमी रविवारी शके १५६९ मध्ये म्हणजेच इ. स १६४७ मध्ये प्राप्त झाला. त्यानंतर त्या आपल्या पतीसमवेत सिउरला परतल्या. देहूहून बहिणाबाई सिउरला गेल्यानंतर त्यांची पुढे काय अवस्था झाली, त्याबद्दल इतिहासाला फारशी माहिती नाही. पुढे लगेचच इ. स. १६४९ मध्ये तुकोबांचे वैकुंठगमन झाले. याही घटनेची चाहूल बहिणाबाईंच्या चरित्राच आढळत नाही. दरम्यान त्यांना वैधव्य आले आणि पुढील ५० वर्षांचा प्रदीर्घ काळ या स्त्रीने सिउरसारख्या आडवाटेच्या गावी तुकारामचिंतनात घालवला आणि योग्य वेळ येताच त्यांनी इ. स. १७०० मध्ये देहत्याग केला. अशी ही बहिणाबाईच्या जीवनाची शोकांतिकाच आहे. तुकाराम महाराजांच्या भेटीचा सहवासाचा काळ वगळता त्या आगेमागे बहिणाबाईंच्या जीवनात अदृष्टाच्या अनेक प्रतिकूल क्रीडा आढळतात. त्यामुळे त्यांच्याकडून वारकरी संप्रदायाच्या अभिवृद्धीसाठी कोणतेही भरीव कार्य होऊ शकले नाही, ही वस्तुस्थिती आहे. यात बहिणाबाईचे नाव पुसून टाकण्याचा वगैरे प्रश्नच निर्माण होत नाही. त्या उलट तुकोबांच्या वैकुंठगमनापासून म्हणजेच इ. स. १६४९ पासून १७०० पर्यंत जी पोकळी निर्माण झाली होती, आणि पेशवाईच्या काळात तुकोबांच्या शिकवणुकीचा जो विसर पडला होता, तो निळोबांनी आपल्या अभंगवाणीने पुनरुज्जीवित केला. निळोबांनी ज्ञानेश्वर-चांगदेव चरित्र लिहिले. संत ज्ञानदेव, संत एकनाथ, संत तुकाराम या वारकरी संप्रदायातील तीन दिव्य विभूतींच्या आरत्या लिहिल्या. त्याचबरोबर बहिणाबाई यांचीसुद्धा आरती गायिली. बहिणाबाईंना ते मातृतुल्य मानीत. तुकोबांची ३३२ श्लोकात लिहिलेली निळोबाकृत स्तुती वेदांताच्या दृष्टीने जेवढी महत्त्वाची आहे, त्याचप्रमाणे ऐतिहासिक व सामाजिक दृष्ट्या अर्थपूर्ण आहे. तुकोबाचे पुत्र नारायणबुवा यांच्या सहवासात निळोबांना भागवतधर्माच्या कार्याची प्रेरणा झाली आणि त्यांनी ती आपल्या जीवनात पूर्णत्वास नेली. इ. स. १७२४ मध्ये नारायणबुवांचे देहावसान झाले. त्यानंतर पुढे २९ वर्षे निळोबांनी वारकरी संप्रदायाची ध्वजा फडकत ठेवली. निळोबांना कुणीही महत्त्व देण्याचा प्रश्नच नव्हता. तुकाराममहाराज यांचे कृपेने निळोबा आपोआपच महत्पदास प्राप्त झाले. त्यांच्यानंतर ही परंपरा शंकरस्वामी सिउरकर यांचेकडे व शंकरस्वामी यांचे कडून







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मल्लप्पा वासकर (इ. स. १७०७-१७९९) यांचेकडे आली ही गोष्ट प्रसिद्ध आहे. हा वारकरी संप्रदायाचा विकास लक्षात घेतल्यास डॉ. मोरे यांचे विवेचन कसे निराधार व एकांगी आहे, हे लक्षात येते. विवेचनाच्या ओघात निळोबांचा गुरुपरंपरेचा एक प्रसिद्ध अभंग निळोबांचा नसून महिपतीचा आहे. असे बेधडक विधान 'तुकाराम दर्शन'मधील पृ. १०८ वर केले आहे. मूळ अभंग असा —

*मुख्य महाविष्णु चैतन्याचे मूळ । सांप्रदाय फळ तेथोनिया ॥*
*हंसरुपी ब्रह्या उपदेशी श्रीहरी । चतुश्लोकी चारी भागवत ॥*
*ते गुज-विधाता सांगे नारदासी । नारदे व्यासासी उपदेशिले ॥*
*राघव चैतन्य केले अनुष्ठान । त्यासी द्वैपायने कृपा केली ॥*
*कृपा करूनि हस्त ठेवियला शिरी । बोध तो अंतरी उसावला ।*
*राघवा चरणी केशवचरण । बावाजीशी पूर्ण कृपा केली ॥*
*बावाजीने स्वप्नी येऊनि तुकयाला । अनुग्रह दिला निजप्रीति ॥*
*जगद्गुरु तुका अवतार नामयाचा । संप्रदाय संकळांचा तेथूनिया ॥*
*निळा म्हणजे मज उपदेश केला । संप्रदाय दिला सकळ जना ॥*

हा अभंग साखरेप्रतीत पृष्ठ १०६ वर आवटे संपादित गाथा पंचकात पृ. १९९ वर आणि जोगसंपादित निळोबांच्या गाथ्यात पृ. ४६५ वर आढळतो. असे असूनसुद्धा हा अभंग साखरे प्रतीतच आढळतो. हा अभंग चुकीने निळोबांच्या नावे जमा करण्यात आला, असे डॉ. मोरे यांनी पृ. १०८ वर केलेले विधान दिशाभूल करणारे आहे.

सारांश, कोणत्यातरी अपहरणकर्त्यांनी वहिणावाईचे नाव पुसून टाकून निळोबांचे महत्त्व वाढविले हे डॉ. मोरे यांचे विधान काल्पनिक आहे. हे अपहरणकर्ते म्हणजे कोण? याचे स्पष्टीकरण डॉ. मोरे यांनी केलेले नाही. हे जोपर्यंत स्पष्ट होत नाही, तोपर्यंत डॉ. मोरे यांचे मत संदिग्ध राहील.

३) 'तुकारामदर्शन' मध्ये डॉ. मोरे यांनी परस्परास छेद जाणारी विधाने केली आहेत. उदा. पृष्ठ ९५ वर 'वारकऱ्यांची ही स्वायत्तता गेल्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत अबाधित होती. परंतु त्यानंतरच्या काळात वारकरी संप्रदायाशी मुळात संबंध नसलेली काही मंडळी त्यात घुसून गीता-भागवताला व ज्ञानेश्वरी गाथेला वेदोपनिषदांच्या चौकटीत बसविण्याचा निकराचा प्रयत्न करून संप्रदायाचे स्वरूप विघडवीत आहेत' असे विधान डॉ. मोरे यांनी केले आहे. तर पृष्ठ २९९ वर थोडक्यात सांगायचे म्हणजे वारकरी संप्रदायाच्या वेदांतीकरणाची व ब्राह्मणीकरणाची प्रक्रिया गेल्याशतकात सुरू झाली असे विधान डॉ. मोरे यांनी केले आहे.

डॉ. मोरे यांच्या दोन विधानांची तुलना केल्यास असे लक्षात येईल, की डॉ. मोरे यांनी पृ. २९९ वर म्हटल्याप्रमाणे वारकरी संप्रदायाच्या वेदांतीकरणाची व ब्राह्मणीकरणाची प्रक्रिया गेल्या शतकात सुरू झाली तर मग गेल्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत वारकरी संप्रदायाची स्वायत्ता अबाधित होती, हे पृ. ९५ वरचे विधान चूक ठरेल. कारण गेले शतक म्हणजे एकोणिसावे शतक. या शतकात एक तर वारकऱ्यांची स्वायत्तता अवाधित होती असे तरी म्हणावे लागेल

किंवा या शतकात वेदांतीकरणाची व ब्राह्मणीकरणाची प्रक्रिया सुरू झाली, असे म्हणावे लागेल. वारकऱ्यांची स्वायत्तता कोणत्या शतकापर्यंत अबाधित होती व कोणत्या शतकापासून वारकरी संप्रदायाच्या वेदांतीकरणाची व ब्राह्मणीकरणाची प्रक्रिया सुरू झाली, याबद्दल डॉ. मोरेच संभ्रमित दिसतात. कोणत्याही का शतकात असेना वेदांतीकरणामुळे व ब्राह्मणीकरणामुळे वारकऱ्यांची अबाधित स्वायत्तता नष्ट झाली असा निष्कर्ष डॉ. मोरे यांच्या दोन विधानातून निघू शकतो. त्यापैकी वारकऱ्यांच्या अबाधित स्वायत्ततेचा विचार यापूर्वीच केला आहे वेदांतीकरणाबद्दलही यापूर्वी विचार केला आहे. पण हे ब्राह्मणीकरण म्हणजे नेमके काय? या संबंधी विचार केला पाहिजे.

वारकरी संप्रदायाचे ब्राह्मणीकरण झाले म्हणजे नेमके काय झाले, याचा अंदाज पृ. २९९ वर डॉ. मोरे यांनी विनायकबुवा साखरे आणि लो. टिळक यांच्यातील मतभेदाचा जो प्रसंग उल्लेखिला आहे, त्यावरून येतो. साखरेपरंपरेबद्दलच डॉ. मोरे यांना राग दिसतो. ते लिहितात, 'ज्ञानेश्वरी वेदांताच्या आधारे सांगायची म्हणजे वेदांताचे ज्ञान हवे. हे ज्ञान मिळवायचा 'शॉर्टकट' म्हणून साखरेपरंपरेने पं. निश्चलदास यांचे विचारसागर व वृत्तिप्रभाकर हे दुय्यम ग्रंथ वारकऱ्यांमध्ये प्रचलित केले. त्याचा आजचा परिणाम म्हणजे कित्येक वारकरी ज्ञानेश्वरीचा व अभंगाचा खुंटीसारखा उपयोग करून विचारसागरच सांगतात. शिवाय वेदांतामध्ये अधिकार भेद असल्यामुळे वर्णाश्रम, सोवळे-ओवळे, या बाबींनीही वारकऱ्यांमध्ये प्रवेश केला.' (तुकारामदर्शन पृ. २९९) यास डॉ. मोरे वारकरी संप्रदायाचे वेदांतीकरण व ब्राह्मणीकरण म्हणत असावेत. म्हणजेच वारकरी संप्रदायात पूर्वापार सोवळ्या-ओवळ्याची व वर्णाश्रमव्यवस्थेची मर्यादा नव्हती आणि ती साखरेपरंपरेनेच निर्माण केली असे डॉ. मोरे यांना म्हणावयाचे असेल तर ते चूक आहे. सोवळे-ओवळे, वर्णाश्रमव्यवस्था हा भारतातील हिंदूधर्माचाच एक भाग होता. म्हणून तर आगरकरांसारख्या समाजसुधारकांनी 'सोवळ्या-ओवळ्याची मीमांसा' केली. जो संपूर्ण हिंदुव्यवस्थेचा प्रश्न आहे, तो केवळ एका साखरेपरंपरेने किंवा अन्य कोणत्या परंपरेने निर्माण केला असे म्हणणे अन्यायकारक आहे. महाराष्ट्रात वारकरी संप्रदाय आहे व त्यात सोवळे-ओवळे आहे या दोन गोष्टी वेगळ्या आहेत. वर्णाश्रमव्यवस्था सोवळ्या-ओवळ्याच्या कल्पना हा हिंदू समाजव्यवस्थेचा भाग आहे. वारकरी संप्रदायाने जर काही केले असेल तर वर्ण, जात, धर्म यांचे अहंकार विसर्जित करण्याची प्रक्रिया निर्माण केली. त्या व्यवस्थेला धक्का पोचेल अशी कोणतीही प्रक्रिया वारकरी संप्रदयाने केली नाही.

लो. टिळक आणि विनायकबुवा यांचे वैचारिक मतभेद ही एक प्रासंगिक घटना आहे. एका पातळीवर आगरकरांचेही टिळकांशी मतभेद होते. मग आगरकरांच्या पक्षास आपण दोष देतो काय? कोणत्याही दोन व्यक्तींच्या मतभेदावरून संपूर्ण वारकरी संप्रदायाचे ब्राह्मणीकरण व वेदांतीकरण झाले, हे म्हणणे चूक आहे. विनायकबुवा साखरे हे ब्राह्मण होते याचा अर्थ संपूर्ण वारकरी संप्रदाय त्यांच्या इशाऱ्यावर चालत होता, असे नाही किंवा साखरेमहाराजांनी वेदांताच्या निकषातून ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाची पद्धती निर्माण केली म्हणजे वारकरी संप्रदायाचे वेदांतीकरण

झाले, हे म्हणणे चूक ठरेल. कारण असे जर गृहीत धरले, तर शिवकल्याण याने लिहिलेली 'नित्यानंदैक्यदीपिका' (रचनाकाल इ. स. १६३५) ही अमृतानुभवावरची टीका येथूनच वेदांतीकरणास सुरुवात झाली, असे म्हणावे लागेल. शिवकल्याण हे ज्ञानेश्वर, मुक्तावाई परंपरोतील चौदावे अधिकारी पुरुष होते. त्यांनी लिहिलेली भागवताच्या दशमस्कंधावरील टीका पूर्णपणे अध्यात्मपर आहे. ही वेदांतीकरणाची प्रक्रिया शिवकाळापासून सुरू झाली असे म्हणावे लागेल. अशी कुठलीही प्रक्रिया सुरू होऊन वारकरी संप्रदायाचे वेदांतीकरण व ब्राह्मणीकरण झालेले नाही.

'वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ।'

असे ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायातील गणेशस्तवनात म्हटल्याप्रमाणे वेदांत हा तर या गणेशमूर्तीच्या हातातील महारसपूर्ण मोदकच शोभून दिसतो. त्यास डावलता येणे शक्य नाही. दुसरी महत्त्वाची गोष्ट काही ब्राह्मण या संप्रदायात आहेत आणि त्यांच्यामुळे या संप्रदायाचे चालू शतकात ब्राह्मणीकरण झाले असे डॉ. मोरे यांना म्हणावयाचे असेल तर तेही चूक आहे. कारण वारकरी संप्रदायाचे मुख्य मानकरी फडकरी देहूकर, वासकर, सातारकर हे सर्व ब्राह्मणेतर आहेत. ते सर्व वारकरी समाजास वंदनीय आहेत. पालख्या दिंड्या यात देहुकर, वासकर यांना जेवढा मान आहे, तेवढा कुणालाही नाही. अर्थात ही गोष्ट भूषणावह आहे. असे असताना चार दोन क्षुल्लक ब्राह्मण वारकरी या संप्रदायाचे ब्राह्मणीकरण करतात, या म्हणण्यावर कोण विश्वास ठेवील? वि. न. जोग, विनायकबुवा साखरे, शं. वा. दांडेकर यांनी वारकरी संप्रदायाच्या अध्ययन-अध्यापन परंपरेच्या विकास केला पण कोणाच्याही विचार स्वातंत्र्यावर त्यांनी हल्ला केला नाही. त्यांच्या पठडीतून तयार झालेले अनेक जाती-जमातीचे विद्यार्थी आजही वारकरी संप्रदायाचा दूरवर प्रसार करीत आहेत. या व्यतिरिक्त सोवळे-ओवळे, स्नानसंध्या हा भाग वैयक्तिक आहे. त्याबद्दल कुणीच कोणाला बोलणे योग्य नाही. प्रत्येकाला त्याच्या इच्छेनुसार धर्माचे पालन करण्याचा अधिकार आहे. त्याचा दुसऱ्यास उपसर्ग होणार नाही किंवा दुसऱ्याच्या भावना दुखावल्या जाऊ नयेत, याची काळजी घेतली पाहिजे. गरजेनुसार सोवळ्यासही वारकऱ्यांनी मुरड घातल्याची उदाहरणे मामासाहेब दांडेकरांच्या चरित्रात आढळतात. तरीपण वारकरी संप्रदायाचे ब्राह्मणीकरण झाले असे डॉ. मोरे यांना म्हणावयाचे असेल तर त्या विधानातील संदिग्धता त्यांनी दूर केली पाहिजे.

४) 'तुकारामदर्शन'मध्ये काही काही ठिकाणी अनेक गंमतीदार प्रकार घडले आहेत. जसे: विष्णु परशराम पंडित हे विधवाविवाहाचे कट्टर समर्थक होते. त्यांनी स्वत:च एका विधवेशी विवाह करून रानडे प्रभृती आपल्या सहकाऱ्यापेक्षा आपले वगळेपण सिद्ध केले. अशा तऱ्हेने विष्णु परशराम पंडित यांचा डॉ. मोरे यांनी गौरव केला हे योग्यच झाले. पण त्यानंतर डॉ. मोरे पृ. २९९ वर लिहितात —

'मुळात विधवा विवाहाच्या समस्येने गंभीर रूप धारण केले. याचे कारण जरठकन्याविवाहाची दुष्ट प्रथा. म्हातारा नवरा आणि कोवळ्या वयाची नवरी यांच्यामधील विषम विवाहाचा उपहास तुकोबांनीही केलेला होताच.

'मांडवाच्या दारा । पुढे आणिला म्हातारा ॥
म्हणे नवरी आणा रांड । जळो नवऱ्याचे तोंड ।
समय न कळे । काय उपयोगी ये वेळे ।
तुका म्हणे खरा । येथूनिया दूर करा ॥'

वरील अभंग उद्धृत करून डॉ. मोरे यांनी या अभंगात तुकोबांनी विषमविवाहाचा उपहास केला आहे असे वेधडक विधान केले आहे. आता ही गोष्ट खरोखरच हसण्यासारखी आहे. कारण वरील अभंगात म्हातारा नवरा व कोवळ्या वयाची नवरी यांच्या विवाहाचे वर्णन नसून ही एक प्रसिद्ध विनोदी दृष्टांतकथा आहे. एका विवाहप्रसंगी ठरलेल्या मुहूर्तावर लग्नमंडपात वधुवर आले नाहीत, हे पाहून त्या मांडवात असलेला एक फटकळ म्हातारा चिडून म्हणाला, 'अरे ती नवरी रांड कुठे आहे तिला लवकर आणा आणि तो नवरा सुद्धा अद्याप दिसत नाही. त्या नवऱ्याचे तोंड जाळा' ज्याला कोणत्या प्रसंगी काय बोलावे हे समजत नाही. अशा गाढवाला या प्रसंगातून दूर करावे असे तुकाराम महाराजांनी शेवटी म्हटले आहे. पण डॉ. मोरे यांनी संपूर्ण अभंगाचा आशयच बदलून टाकला आहे. यास काय म्हणावे? समाजसुधारकांच्या दावणीला तुकोबांना बांधण्याची एवढी घाई कशासाठी?

असेच एक दुसरे उदाहरण पृ. ६७ वर आढळते. डॉ. मोरे लिहितात — 'संपूर्ण वेदवाङ्मयाचे सार किंवा अंतिम परिणती म्हणजे उपनिषदे अथवा वेदांत. या वेदांताचे सार सांगणारा तुकोबांचा पुढील अभंग मला फार महत्त्वाचा वाटतो.

'ओम तत्सदिति सूत्राचे ते सार । कृपेचा सागर पांडूरंग ॥
हरि: ओम्‌सहित उदात्त अनुदात्त । प्रचुरीस्वरासाहित पांडुरंग ॥
गोब्राह्मणहिता होउनि निराळे । वेदाचे मूळ तुका म्हणे ॥

हा अभंग उद्धृत करून पुढे डॉ. मोरे लिहितात.

या अभंगातून वेदांच्या उदात्त, अनुदात्त आणि प्रचय स्वरांचा उल्लेख करून तुकोबांनी ईश्वर कृपासागर आहे असा वेदांचा सारार्थ सांगितला आहे. कृपेचा सागर असलेला पांडुरंग भेदाभेद, आवडनिवड करणार नाही. जे ईश्वरी कृपा हा काही ठराविक लोकांचा विशेषाधिकार आहे, असे मानतात ते वेदांचा चुकीचा अर्थ लावतात. वेदांचे मूळ गोब्राह्मण हितापेक्षा वेगळे आहे, असे तुकोबा ठामपणे सांगतात. पुढे पृ. ६८ वर डॉ. मोरे वरील अभंगावद्दल म्हणतात.

'तुकोबांची भाषा ही नंग्या तलवारी सारखी आहे. तिला जणु म्यान माहितच नाही. म्हणून तर या अभंगात त्यांनी वेदांचे तात्पर्य गोब्राह्मणहित अथवा गोब्राह्मणप्रतिपालन आहे, असे मानणाऱ्या विचारसरणीचा प्रत्यक्ष उल्लेख करून ते तसे नाही असे निदर्शनादस आणून दिलेले आहे.

तुकोबांचा मूळ अभंग आणि त्यावर डॉ. मोरे यांनी केलेले भाष्य पाहिल्यास अभंगाचा आशयच बदलून टाकण्याचे डॉ. मोरे यांचे धाडस लक्षात येते. काही ठिकाणी अभंगाच्या संहितेतही फरक आढळतो. जोग प्रतीत प्रस्तुत अभंगाचा तिसरा चरण — पुढीलप्रमाणे आढळतो.

'सर्वस्व व्यापिले सव; होउनि निराळे । वेदाचे जे मूळ तुका म्हणे ॥'

त्यामुळे अभंगाच्या अर्थास निराळीच कलाटणी मिळू शकते. सकलसंतगाथेतही प्रस्तुत अभंगाच्या दुसऱ्या व तिसऱ्या चरणाचा पाठ पुढीलप्रमाणे आढळतो.

'हरि ॐ दत्त उदात्त अनुदात्त । प्रचुररहित पांडुरंग ॥
सर्वस्व व्यापिले सर्वांही निराळे । वेदांचे जे मूळ तुका म्हणे ॥'

यामुळेही दुसऱ्या चरणाचा अर्थ एकदम वेगळ्या प्रकारे होऊ शकतो, हा पाठभेदाचा मुद्दा बाजूला ठेवला तरी प्रस्तुत अभंगात आलेले गीतेचे, उपनिषदाचे, व्याकरणाचे, वेदांताचे संदर्भ ध्यानात न घेतल्यामुळे डॉ. मोरे यांनी प्रस्तुत अभंगावर केलेले विवेचन किती वेगळ्या दिशेने जात आहे, हे लक्षात येईल.हे सर्व संदर्भ ध्यानात घेऊन या अभंगावरचे विवेचन करणे म्हणजे स्वतंत्र विषय होईल. परंतु तुकोबांना जो आशय अभिप्रेतच नाही, तो त्या अभंगाच्या विवेचनात कोंबण्याचा डॉ. मोरे यांचा प्रयत्न अतिशय केविलवाणा आहे. उदा. : 'कृपेचा सागर असलेला पांडुरंग भेदाभेद आवडनिवड करणार नाही' असा अर्थ प्रस्तुत अभंगातून कुठेच सिद्ध होत नाही. तरी पण डॉ. मोरे यांनी तसा तो अर्थ आपल्या विवेचनात लावला आहे. किंवा 'जे ईश्वरीकृपा हा काही ठराविक लोकांचा विशेषाधिकार आहे, असे मानतात ते वेदांचा चुकीचा अर्थ लावतात' असे तुकोबांनी प्रस्तुत अभंगातील कोणत्या चरणात म्हटले आहे, ते डॉ. मोरे यांनी दाखवून द्यावे. तसेच वेदांचे तात्पर्य व गोब्राह्मणहित अथवा गोब्राह्मण प्रतिपालन आहे असे मानणाऱ्या विचारसरणींचा उल्लेख करून ते तसे नाही, असे तुकोबांनी निदर्शनास आणून दिलेले आहे हे प्रस्तुत अभंगातील कोणत्या शब्दातून सूचित होते, याचे स्पष्टीकरण डॉ. मोरे यांनी द्यावे.

तुकोबांचा सार्थ गाथा लिहिणारे शंकरमहाराज खंदारकर, विनायकबुवा साखरे हे डॉ. मोरे यांना सनातनी व वेदांती वाटतात. या सनातनी अर्थकर्त्यांना समर्थ पर्याय देण्याचे श्रेय प्र. न. जोशी यांच्या सार्थ गाथेला डॉ. मोरे यांनी दिले आहे. (पाहा — तुकाराम दर्शन पृ. ३२४) डॉ. प्र. न. जोशी यांनी प्रस्तुत अभंगाच्या शेवटच्या चरणाचा अर्थ पुढीलप्रमाणे दिला आहे. तेथे 'गोब्राह्मण हिता होऊनि निराळे । वेदाचे मूळ तुका म्हणे' असाच पाठ आहे. डॉ. प्र. न. जोशी लिहितात 'वेदांचे हे जे मूळ पांडुरंग स्वरूपाचे आहे ते गोब्राह्मणांच्या हितासाठी निराळे म्हणजे अवतार धारण करून राहिले आहे. पातकांची वाढ झाली की पृथ्वी गाईचे रूप घेऊन ब्रह्मदेवाकडे जाते असा उल्लेख पुराणातून येतो. नंतर मग भगवंताचा अवतार होऊन दुष्टांचा नाश होतो, सज्जनांचे रक्षण होते. यात आपोआप गाईचेही रक्षण आलेच. ब्राह्मण हे वेदरक्षणकर्ते, ज्ञानाचे, परब्रह्माचे, रक्षणकर्ते म्हणून त्यांच्या रक्षणात सर्व आले असा भावार्थ. (पहा तुकारामाची सार्थ गाथा खंड तिसरा — संपादक प्र. न. जोशी — आवृत्ती पहिली पृ. ५७५)

हे सर्व पाहिल्यानंतर माझ्यासारख्या वाचकासमोर प्रश्न निर्माण होतो, की तुकोबांच्या अभंगाचा कोणता अर्थ खरा? सनातनी मंडळींनी लावलेला अर्थ खरा की सनातनी अर्थकर्त्यांना समर्थ पर्याय देणाऱ्या डॉ. प्र. न. जोशींनी लावलेला अर्थ खरा, की कोणतेच संदर्भ विचारात न घेता डॉ. मोरे यांनी लावलेला अर्थ खरा?

एकूण 'तुकाराम दर्शन' हा अभ्यासपूर्ण ग्रंथ आहे. याबद्दल वादच नाही. तो लिहिण्यासाठी डॉ. मोरे यांनी खूप परिश्रम घेतले आहेत. पण काही ठिकाणी आततायी व हट्टी भूमिका घेतल्यामुळे त्यातील विवेचन एकांगी बनले आहे.

प्रा. डॉ. यशवंत शंकर साधु
महाराष्ट्र उदयगिरी महाविद्यालय, उदगीर.

आधारभूत साहित्य :-
१) तुकाराम दर्शन — डॉ. सदानंद मोरे
२) वारकरी संप्रदाय : उदय व विकास — भा. पं. बहिरट, प. ज्ञा. भालेराव
३) तुकाराम महाराजांची गाथा भाष्य — शंकरमहाराज खंदरकर
४) सार्थ तुकारामाची गाथा खंड तिसरा — सं. डॉ. प्र. न. जोशी
५) संत निळोबा : चरित्र वाङ्मय आणि कार्य (अप्रकाशित प्रबंध) — डॉ. यशवंत साधु
६) सकल संत गाथा — खंड दुसरा — सं. का. अ. जोशी
७) प्राचीन मराठी वाङ्मयाचे स्वरूप — ह. श्री. शेणोलीकर
८) सार्थ तुकारामाची गाथा भाग दुसरा — विष्णु नरसिंह जोग
९) निळोबांची गाथा — विष्णु नरसिंह जोग

□□

# राज्यविकास संस्थेचे महत्त्वपूर्ण ग्रंथ

डॉ. सदानंद मोरे

(१)

## अभ्यासकांना मोलाची सूची

महाराष्ट्राच्या भूगोलाच्या विस्तारापेक्षा इतिहासाचा विस्तार निश्चितपणे जास्त आहे. तो अशा अर्थाने की एकेकाळी मराठ्यांचा अंमल प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरीत्या जवळजवळ भारतभर होता. साहजिकच मराठ्यांच्या इतिहासाची साधनसामग्रीही विस्तीर्ण भूप्रदेशात पसरली असल्यास नवल नाही. राज्य मराठी विकास परिषदेने 'दक्षिण भारतातील मराठी साहित्याचा इतिहास' हा संशोधन प्रकल्प हाती घेतला. दक्षिण भारतातील तंजावर हे तर शहाजीराजे भोसल्यांच्या काळापासून मराठी सत्तेचे एक केंद्रच असल्याने तिकडे नजर जाणे हे आवश्यक व क्रमप्राप्तच आहे, पण 'तंजावरच्या वाटेवरील काही महत्त्वाची ग्रंथालयेही' प्रकल्पकर्त्यांना खुणवू लागली. त्यातूनच 'मद्रासची मराठी हस्तलिखिते' नावाची वर्णनात्मक सूची सिद्ध झाली. डॉ. वसंत स. जोशी यांनी ही सूची अत्यंत नेटकेपणाने केलेली आहे.

मॅकेंझी आणि टेलर या युरोपियन संग्राहकांचे कष्ट खरे तर मद्रासच्या संग्रहाचे कारण आहे. मराठी हस्तलिखिते, ऐतिहासिक आज्ञापत्रे, सनदा व हस्तलिखित ग्रंथ इत्यादींचा या संग्रहात समावेश आहे. हस्तलिखित ग्रंथात अर्थातच बखरी, कैफियती यांचे बाहुल्य आहे. ही साधने केवळ राजकीय इतिहासाशी निगडित नसून सामाजिक-सांस्कृतिक इतिहासाशी नाते सांगणारी आहेत. राजकीय इतिहासाच्या क्षेत्रातही ती केवळ मराठीशाहीपुरती मर्यादित नाहीत. त्यांच्यात अनागोंदीची कैफियतही मोडते. दक्षिणेतल्या अनेक छोट्यामोठ्या राज्यांच्या हकिकतींचाही समावेश होतो. इतकेच नाही तर उत्तरेकडील राजे व राज्येही त्यातून सुटत नाहीत. विशेषत: दक्षिणेत इंग्रजांनी हातपाय कसे पसरले याचा उलगडा होण्यास योग्य अशी साधनेही त्यात आहेत. काही महत्त्वाच्या घराण्यांची माहिती देणारी साधने तर विपुल आहेत. अर्थात अनेक वेळा इतिहासावर हिंदू पुराणकथांची व कल्पनांची छाया पडलेली दिसते. पण ते अपरिहार्य आहे. विशेष म्हणजे पुणे शहरासंबंधी माहिती देणाऱ्या कैफियती या संग्रहात आहेत. ही माहिती मनोरंजक आणि इतरत्र सहसा उपलब्ध न होणारी आहे. दक्षिणेतील विजापूरसारख्या इतर ऐतिहासिक स्थळांच्या हकिगतीही या संग्रहात आहेत. विशेष म्हणजे मराठ्यांच्या आडनावांसंबंधी रोचक माहिती आणि महाराष्ट्रातील ब्राह्मणांच्या पोटजातींचे वर्णन करणाऱ्या कैफियतीही या संग्रहात सापडतात. भोसले, घोरपडे यांच्यासारख्या मातब्बर मराठा घराण्यांची, पेशव्यांच्या घराण्याची पानिपतच्या लढाईसारख्या महत्त्वाच्या घटनांची, हासन गंगू वहामनी, हैदर, टिपू या मातब्बरांची अशा एक ना अनेक कैफियती मेकँझी साहेबांनी नकलून घेतल्या.



अनुक्रमणिका

हिंदूंची सृष्टीकल्पना, युगकल्पना, हस्तिनापुरासारख्या प्राचीन नगरापर्यंत हकिगत भिडवण्याची प्रवृत्ती या गोष्टी ज्ञात करून देणारा हा संग्रह आहे. तो एक खजिनाच आहे. आज्ञापत्रांमध्ये थोरल्या माधवरांच्या काही आज्ञापत्रांचा समावेश होतो. त्यातून माधवरावांच्या प्रशासनपद्धतीची व करारी स्वरूपाची ओळख पटते.

ऐतिहासिक पत्रांमध्ये विशेषत: मंदिरे, मशिदी, ब्राह्मण यांना दिलेल्या इनामांसंबधीच्या कागदपत्रांचा समावेश आहे.

मेकँझीने करविलेया हस्तलिखितांच्या नकला महत्त्वाच्या यासाठी आहेत, की त्यांच्यापैकी अनेकांची मूळ हस्तलिखिते नष्ट झालेली आहेत किंवा सापडण्याची शक्यता नाही. अशा स्थितीत मराठी राज्याच्या, संस्कृतीच्या व साहित्याच्या अभ्यासकांना ही सूची मोलाची वाटेल यात संशय नाही. डॉ. जोशी यांनी ही सूची सिद्ध करताना संबंधित कागदपत्रांचे व हस्तलिखितांचे संक्षेपाने परंतु यथायोग्य वर्णन केलेले आहे. ते वाचून अनेकांना मद्रासमधील या ओरिएंटल मॅन्युस्क्रिप्टस लायब्ररीला भेट द्यायचा मोह आवरणार नाही, हे मात्र नि:संशय.

(२)

## मराठी संस्कृती अभ्यासकांसाठी छपयुक्त ग्रंथ

मराठी संस्कृतीच्या विद्यमान अभ्यासकांमध्ये डॉ. माणिक धनपलवार यांचे नाव अव्वलांमध्ये मोडते. राज्य मराठी विकास परिषदेने त्यांच्या 'दक्षिणात्य साहित्य-संस्कृतीचा मराठीशी अनुबंध' हा शोधग्रंथ छापून या अभ्यासक्षेत्रात मोलाची भर घातली आहे.

महाराष्ट्राची संस्कृती ही आर्य व द्रविड या संस्कृतीचा संगम आहे, हे सूत्र धनपलवारांनी प्रारंभीच मान्य केले आहे. महाराष्ट्र, कर्नाटक आणि आंध्र यांच्या परस्परसंबंधाविषयी व त्यांच्यामधील सांस्कृतिक देवाणघेवाणीविषयी बरेच लिहिले बोलले गेले आहे. पण हाच तो स्वतंत्र अभ्यासाचा विषय करून त्यावर पद्धतशीर मांडणी करणे हे धनपलवारांचे वैशिष्ट्य मानावे लागेल.

या संस्कृतीक्षेत्राच्या केंद्रस्थानी अर्थातच तंजावर आणि तंजावरचे मराठी राजे आहेत, हे वेगळे सांगायला नको.

ग्रंथातील चर्चेचे साहित्य आणि संस्कृती असे दोन भाग धनपलवारांनी केलेले आहेत. साहित्यात मुख्यत्वे अवतीर्ण होतात ती आख्यानकाव्ये; परंतु यक्षगान नाटकप्रबंध प्रयोगक्षम असल्यामुळे त्यांची वेगळी चर्चा व्हायला हवी होती असे वाटते.

दक्षिणेतील मराठी आख्यानकवितेवर तेलगू, कन्नड कवितेचा कसा प्रभाव पडला आहे याची सविस्तर चर्चा लेखकाने केलेली आहे. मात्र ही चर्चा ते समस्यांच्या अनुरोधाने करतात. उदाहरणार्थ महाराष्ट्रात मराठी साहित्याला शृंगाराचे वावडे असताना तंजावरला मात्र भक्तिविरहित शृंगाराने 'दमयंती स्वयंवर' का निर्माण व्हावे असा प्रश्न धनपलवार उपस्थित करतात व त्यातून पुढील चर्चेची निष्पत्ती होते. या चर्चेत निरंजन माधवाला महाराष्ट्रातील कवी न मानता दाक्षिणात्य समजायला हवे असे एक नवे वाङ्मयेतिहासिक प्रमेय हाती लागते.

प्रतापसिंह आणि सर्फोणी (दुसरा) यांनी रचलेल्या 'कुरवंजी' धर्तीच्या मराठी

आख्यानकाव्यांचा परिचय धनपलवार या संदर्भात करून देतात. या काव्यात कुरत्ती किंवा कैकाडीण हे पात्र आल्यामुळे त्याला दाक्षिणात्य यक्षगानाची रंगछटा प्राप्त झाली असल्याचेही ते निदर्शनास आणून देतात. ते बरोबरच आहे. परंतु या ठिकाणी एका गोष्टीचा आवर्जून उल्लेख करायला हवा. शकुन ज्योतिष सांगणाऱ्या या कैकाडी/कैकाय स्त्रीचा पीरचय महाराष्ट्राला पूर्वीपासून होता. एकनाथांचे 'कैकाय' नावाचे भारूड आहे. त्यात ही कैकाडीण अम्मा अवतीर्ण होते. भविष्य सांगते. या भारुडात एकनाथ अनेक कन्नड व तेलगू शब्द वापरतात. इतकेच नव्हे तर 'नमो कानडी भाषा । केळीव शीघ्रता ।' आणि 'नमो दिशो । मच्छमच्छ भाषा।' असे भाषिक वैशिष्टांचे उल्लेखही करतात. थोडक्यात या अनुबंधाच्या तपास करताना आणखी मागे जायची गरज आहे.

तंजावर आणि महाराष्ट्र यांच्यातील संबंधाची चर्चा करताना यक्षगान या रूपबंधाचा विचार होणे अपरिहार्य ठरते. मराठी रंगभूमीच्या (विष्णुदास भावे) उष:कालाचा संदर्भही येतोच येतो. याबाबतीत धनपलवार यांची स्वतंत्र मते आहेत. मराठी नाटकाची गंगोत्री तंजावरच्या नाटकात नसून कन्नड यक्षगानात आहे, या त्यांच्या मतावर मराठी नाटकाच्या अभ्यासकांनी डोके खाजवायला हरकत नाही. भाव्यांना किंवा त्यांच्या आश्रयदात्यांना तंजावरच्या नाटकांची वा रंगभूमीची कल्पनाच नव्हती, असे ते स्पष्ट सांगतात.

संगीत, वृत्त आणि छंद यांची चर्चा हे धनपलवारांच्या संशोधनाचे एक वैशिष्ट्य आहे. पारंपारिक संस्कृती रसवृत्तविचारांपासून मराठी कवींनी कशी आणि किती फारकत घेतली, याचेही विवेचन करतात.

वृत्ताचा संबंध संगीताशी - गायन-वादनाशी असतो. या संदर्भात धनपलवारांची केलेली 'दिंडी' वृत्ताची चर्चा लक्षणीय आहे. प्रियोळकर म्हणतात आणि धनपलवार अनुमोदतात त्याप्रमाणे दिंडी हे तंतुवाद्य होय. 'सोपे वर्म आम्ही सांगितले संती । टाळ दिंडी हाती घेऊन नाचा॥' किंवा 'टाळदिंडी हाती । वैकुंठीचे ते सांगाती ॥' या तुकारामांच्या वचनांवरूनही ते प्रमाणित होते.

संस्कृतीची चर्चा धनपलवार विस्ताराने करतात. धर्म हे संस्कृतीचे महत्त्वाचे अंग आहे. धनपलवार नायन्मार वीरशैल वारकरी या धर्मपंथाचे विवेचन करतात. त्यांच्या परस्परप्रभावांच्या शक्यतेचाही धांडोळा घेण्याचा प्रयत्न करतात. पण तो अपुरा वाटतो. त्याचा विस्तार व्हायला हवा. तंजावरच्या मराठी लोकांच्या श्रद्धास्थांनाचा ते परिचय करून देतात. तंजावर हे त्यांनी म्हटल्याप्रमाणे उपासना करणाऱ्या मराठी भाषकांनी त्यागराज, नटराज यांनाही आपलेसे केले होते. अय्यण, मुरुगन यांचेही गुणगान केले. तेथील शैव संतांचाही आदर केला. धनपलवार तमिळ संतांवरील मराठी कीर्तनाख्यानांचा स्वतंत्र विचार करतात.

तंजावरकडील मराठी लेखकांनी तेलगु यक्षगानातून प्रेरणा घेतली असली तरी कीर्तनाच्या बाबतीत मात्र त्यांनी महाराष्ट्रातील परंपराच चालविली आहे, असे धनपलवार निदर्शनास आणून देतात. विशेष म्हणजे यामुळे उलट मराठी कीर्तनपद्धतीचाच तमिळी कीर्तनावर प्रभाव पडल्याचेही सांगतात. तंजावर परिसरात होणाऱ्या तमिळ कीर्तनात तुकारामाचा एक तरी अभंग

नियमाने म्हटला जातो.

'तंजावरी मराठी' हे प्रकरण तांत्रिक भाषाशास्त्रीय चर्चेचे आहे. तसेच 'आरे मराठी' वरील प्रकरणही. तंजावरी मराठी म्हणजे द्राविड भाषा प्रभावित शिवकालीन बोली तर आरे मराठी म्हणजे वऱ्हाडी-मराठवाडी बोलींचे तेलगुप्रभावित रूप असे साधार निष्कर्ष ते या भाषांचे निरीक्षण व विश्लेषण करून काढतात.

सांस्कृतिक अनुबंधांचे एक गमक म्हणजे देवता. विठ्ठल आणि खंडोबा ही दोन दैवते महाराष्ट्र व दक्षिण यांना समान आहेत. संस्कृतींना जोडणारी आहेत. या दैवतांची चर्चा धनपलवार करतात. 'आंध्रातील विठ्ठलभक्तिधारा' हे या पुस्तकातील एक वाचनीय प्रकरण आहे. कोरीव लेख, व्यक्तिनामे, ग्रंथरचना आणि स्फुटरचना आणि मूर्ती मंदिरे यांच्या आधारे धनपलवारांनी या धारेचा मागोवा घेतला आहे. शिवाय संबंधित मठाचीही माहिती त्यांनी दिली आहे.

म्हाइंभटरचित 'लीळाचरित्र' हा आंध्रमहाराष्ट्र सांस्कृतिक संबंधावर प्रकाश टाकणारा सर्वात प्राचीन ग्रंथ. त्यात इतस्त: विखुरलेल्या संदर्भांच्या आधारे धनपलवार एक संगतवार चित्र उभे करतात. धवलगीत किंवा धवले हा तर लोकगीतांचा प्रकार, पण त्याचाही आधार त्यांनी संबंध स्पष्टीकरणासाठी घेतला आहे.

तंजावरात एकोजी राजे भोसले यांच्या पदरी असलेले व नंतर शिवरायांकडे आलेले रघुनाथपंत हणमंते यांनी शिवरायांच्याच सांगण्यावरून 'राज्यव्यवहारकोश' निर्माण केला या रूढ समजुतीला छेद देणारे कोशकर्तृत्व धुंडिराज व्यास यांचे आहे व कोश संभाजीराजांच्या काळी सिद्ध झाला असे प्रमेय धनपलवार मांडतात. त्यावर जरूर विचार व्हायला हवा.

डॉ. धनपलवार यांनी हा अभ्यास आणखी पुढे नेऊन मराठी संस्कृतीच्या अभ्यासकांना कायमचे ऋणाईत करून ठेवावे अशी अपेक्षा आहे.

□

१) मद्रासची मराठी हस्तलिखिते : संपादक डॉ. वसंत स. जोशी
नोव्हेंबर १९९६, मूल्य १५० रुपये

२) दाक्षिणात्य साहित्य-संस्कृतीचा मराठीशी अनुबंध : डॉ. माणिक धनपलवार
ऑक्टोबर १९९७, मूल्य ३०० रुपये

प्रकाशक : राज्य मराठी विकास संस्था, ३ महानगरपालिका मार्ग, मुंबई ४०० ००१.

---

**स्वागत**

- **अभिताभ :** लेखक - सौम्य बंद्योपाध्याय : मराठी अनुवाद : अशोक शहाणे, अमेय प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५४२
- **अथातो मृत्युजिज्ञासा :** प्रभाकर अडसुळ, सुश्री सुधाकिरण प्रकाशन, इंदुर, पृष्ठे ३५२
- **बत्तेरी :** विनायक धुरी, प्रभात प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ८८
- **प्रतापी बाजीराव :** म. श्री. दीक्षित, उत्कर्ष प्रकाशन, द्वि. आ. पुणे, पृष्ठे २५८
- **संख्याशास्त्र : शोध, बोध व वेध :** उल्हास गुप्ते, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९९
- **ऑपरेशनची भीती कशाला :** चंद्रकांत पुरचुरे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११२

---

# ग्रामीण बोलीचे काही विशेष

डॉ. गो. मा. पवार

*मराठी ग्रामीण बोलीमध्ये काही शब्द व काही वाक्प्रचार विशिष्ट अर्थाने वापरले जाताना आढळतात. हे विशिष्ट शब्द आणि वाक्प्रचार नागर भाषेत मात्र वापरले जाताना आढळत नाहीत. त्यांचा उपयोग हे खास ग्रामीण बोलीचे वैशिष्ट्य म्हणता येईल. अशा काही शब्दांचा आणि वाक्प्रचारांच्या विचार प्रस्तुत टिपणात केला आहे.*

(१) अत्यंत प्राचीन काळापासून येथील लोकांचा जगातील अन्य संस्कृतींतील व वंशातील लोकांचा संबंध येत होता. या विभिन्न संस्कृतीतील व वंशातील लोकांबद्दलची स्मृती ग्रामीण बोलीतील काही शब्दांनी अद्यापही टिकवून ठेवल्याचे दिसून येते.

खेडेगावातील लोक एखाद्या व्यापाऱ्याचा, वाण्याचा उल्लेख गौरवाने 'पन्नी' असा करतात. समजा, ह्या वाण्याचे नाव विश्वनाथ असेल तर त्याला 'इसा पन्नी' असे ते संबोधतील. अत्यंत प्राचीन काळी फिनिशियन लोक हे भारतात व्यापारानिमित्त येत असत. त्यांच्या 'फिनिशियन' ह्या नावापासून 'पन्नी' हा शब्द व्युत्पन्न होऊन तत्कालीन बोलीमध्ये रूढ झाला असावा. 'फिनिशियन' या मूळ नावावरून 'पणि' हे रूप वेदकाळात निर्माण होऊन पुढे संस्कृत भाषेतही प्रविष्ट झालेले दिसते. प्राचीन काळी फिनिशियन लोकांचा आणि आपला जो व्यापारी संबंध होता त्याचीच आठवण ग्रामीण बोलीत आजही वापरात असलेल्या 'पन्नी' ह्या शब्दात टिकून राहिलेली दिसते.

'अक्कड' असा एक शब्द ग्रामीण बोलीत 'ऐट' या अर्थाने वापरला जातो. या अर्थाच्या जवळपास असणाऱ्या अन्य छटा दाखविण्यासाठी 'अक्कडबाज', 'आखडू' (गर्विष्ठ) हे शब्दही उपयोगात येताना दिसतात. 'अक्कड' अथवा 'अक्केडियन' या नावाची संस्कृती मेसापोटेमिया येथे अस्तित्वात होती. बॅबिलोनियन, सुमेरियन या संस्कृतीचाच 'अक्कड' ही संस्कृती एक भाग होती असे इतिहासातील पुराव्यावरून समजते. ही संस्कृती नष्टच झालेली आहे, परंतु या संस्कृतीतील पुरुषांच्या राहणीचा, वागण्याचा जो प्रत्यय अत्यंत प्राचीन काळी भारतीयांना आलेला असेल, त्यामधून ह्या लोकांचा ऐटबाजपणा अथवा गर्विष्ठपणा जाणवलेला असावा. त्याचीच स्मृती 'अक्कड' या शब्द प्रयोगामध्ये अद्यापही ग्रामीण मराठी बोलीने टिकवून धरलेली असावी असे वाटते.

खेडेगावातील बोलीत, मोठ्या ओठाचा निर्देश करताना 'बाबर ओठ', 'बाबऱ्या ओठाचा' अशा शब्दाचा उपयोग केला जातो. वर्बर वंशातील लोकांचे शारीर वैशिष्ट्य बोलीतील ह्या शब्दामधून निर्देशिले जाते असे म्हणता येणे शक्य आहे.



अनुक्रमणिका

अन्य संस्कृती संबंधातून निर्माण झालेले हे शब्द खेडेगावातील भाषेत टिकून राहिलेले आहेत, मात्र शहरी लोकांच्या बोलण्यात ते येत नाहीत. याचे स्पष्टीकरण करणेही शक्य आहे. ग्रामीण लोकांच्या जीवनात, जीवनपद्धतीत फारसा फरक पडत नाही. जो फरक पडतो तो अतिशय मंद स्वरूपाचा असतो. शहरी जीवनात मात्र अशा प्रकारचा फरक झपाट्याने होत असतो. म्हणून शहरी लोकांच्या भाषेतसुद्धा हा बदल झपाट्याने होतो. जुने शब्द जाऊन नवे शब्द येतात. जुन्या संबंधांची स्मृती लवकर पुसली जाते. खेडेगावामध्ये असे होत नसल्याने अन्य प्राचीन संस्कृती व वंश यांच्याशी आलेल्या संबंधातून निर्माण झालेले शब्द ग्रामीण बोलीत अद्यापही टिकून राहिलेले दिसून येतात.

(२) मराठी ग्रामीण बोलीचा एक विशेष असा आहे - मूळ संस्कृत शब्दांपासून सिद्ध झालेले शब्द व त्या अनुरोधाने निर्माण झालेले वाक्प्रचार ह्या बोलीमध्ये आढळून येतात. हे शब्द अथवा वाक्प्रचार उत्तम तऱ्हेने प्रत्यय देणारे असे आहेत. मूळ संस्कृत शब्दाचे तद्‌भव रूप मराठीमध्ये उपयोगात आणताना त्यामध्ये रूपकप्रक्रियाही झालेली आढळते. अशा काही शब्दांचा खाली विचार केला आहे.

एखाद्या अतिशय गाढ झोपलेल्या व हाका मारूनही जागे न होणाऱ्या व्यक्तीला उद्देशून 'ऊठ की, अशी कशी मुरसन तुला आली?' असे म्हटले जाते. येथे 'मुरसन' हा शब्द अती गाढ झोप या अर्थाने वापरला जातो. परंतु तो मूळ संस्कृत शब्दाचे 'मूर्च्छना' ह्या शब्दाचे तद्‌भव रूप असून तो वापरताना रूपकप्रक्रिया झालेली आहे. हा शब्द केवळ ग्रामीण भाषेतच वापरला जातो. एखाद्याने केलेल्या उपकाराचा स्पष्ट शब्दाने उल्लेख यासाठी 'उजगारणे' ह्या क्रियापदाचा उपयोग केला जातो. उदा. 'केलेलं उजगारून कशाला दाखवायला पाहिजे?' 'उजगारणे' हे क्रियापद संस्कृतमधील 'उद्‌गार' पासून सिद्ध झालेले आहे हे स्पष्टच आहे. 'खेम लावणे' असा एक शब्दप्रयोग खेडेगावामध्ये बोलीत आढळतो. एखाद्याशी आपणहून संबंध जोडीत राहणे या अर्थाने हा शब्दप्रयोग केला जातो. म्हणजे एखादी व्यक्ती दुसऱ्याशी चांगले वागत नसेल तरीसुद्धा आपणहून त्या व्यक्तीकडे जात राहणे, तिला किंमत देणे या अर्थाने 'ती तुला विचारीत नाही तर तू पुन्हा पुन्हा कशाला जातोस तिला खेम लावायला' असा वाक्यामध्ये उपयोग केला जातो.येथे खेम लावणे म्हणजेच 'क्षेम अलिंगन' ह्या संस्कृत वाक्प्रयोगातून सिद्ध झालेले दिसते. हा वाक्प्रयोग सिद्ध होताना येथे रूपकप्रक्रिया घडलेली आहे असे दिसून येते. हा शब्दप्रयोगही केवळ ग्रामीण बोलीतच दिसून येतो. 'मथून खेळणे' हा शब्दप्रयोग खेळणाऱ्या दोघांनी आधीच विचारविनिमय करून खेळाचा निर्णय काय लावायचा हे ठरवून त्याप्रमाणे खेळणे असा होतो. उदा. दोन कुस्तीगिरांच्या संदर्भात, त्यांची कुस्ती निकालात होत नसेल, तर अथवा अपेक्षेप्रमाणे जिद्दीने होत नसेल तर बघणारे असे म्हणतात की ते 'मथून' खेळतात. म्हणजेच परस्परात पूर्वविचार करून ठरवून खेळतात. येथे 'मथून खेळणे' हा शब्द 'मंच' (विचार करणे) किंवा 'मथ्' (मंथन करणे) ह्या क्रियापदापासून सिद्ध झालेला असणे स्वाभाविक आहे. 'सपादणी करणे' हा शब्दप्रयोग खेडेगावात जुजबी कारण

सांगून समर्थन करणे या अर्थाने वापरला जातो. सम् - पदचे प्रयोजक रूप ह्याच्या मुळाशी असणार. हे सर्व शब्दप्रयोग रूपकप्रक्रिया घडून मूळ शब्दात क्वचित अर्थांतर घडवून ग्रामीण भाषेत उपयोगात आणले जातात. सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करणारे हे साधित शब्द वा वाक्प्रचार ग्रामीण बोलीत तेवढे अद्यापही उपयोगात आणले जातात असे दिसून येते.

ग्रामीण बोलीतील शब्दसंग्रहामध्ये एक मजेदार विशेष आढळून येतो. मूळ संस्कृत शब्दापासून सिद्ध झालेले काही साधित शब्द ग्रामीण बोलीत सर्रास वापरले जातात. उदा. 'अवस', 'पुनव', 'रात', 'सांज', 'सय', 'गवसणे' इत्यादी. हे शब्द खेडेगावातील लोकांच्या बोलण्यात सर्रास असले तरी शहरी लोकांच्या तोंडी मात्र हे शब्द नसतात. समजा शहरी माणसाने पुढीलप्रमाणे ह्या शब्दांचा उपयोग केला तर बाकीचे लोक त्याला हसतील. उदा. 'आज अवस आहे, रातचं येऊ नको'. 'आज पुनव आहे, सांज कधी झाली कळलं नाही' 'मला तुझी फार सय होते'. 'माझं पुस्तक गवसलं का?' अशा प्रकारचे शब्दप्रयोग करणारा मनुष्य शहरात गावंढळ म्हणून समजला जाईल. मात्र गमतीची गोष्ट अशी की, हेच शब्द कवितेमध्ये सर्रास वापरले जातात व या वापराला कुणी गावंढळ म्हणत नाही, उलट ह्या शब्दांचा कवितेमधील उपयोग काव्यात्म मानला जातो. कवितेत 'रात निळी, रात निळी त्यात सखे तू जवळी', 'हरवले ते गवसले का', 'काल अवसेला केली घरी पुनव साजरी'. या प्रकारचे शब्दप्रयोग कितीतरी आढळतात व ते मोठे काव्यात्म समजले जातात.

शहरी लोकांच्या बोलण्यात संस्कृत शब्दापासून सिद्ध झालेल्या ह्या शब्दांना अजिवात थारा मिळत नाही. ते मूळ संस्कृत शब्द तत्सम रूपातच वापरतात. असे असताना ग्रामीण बोलीने कायम वापरात ठेवलेली संस्कृत शब्दाची ही तद्भव रूपे शहरी कवींच्या कवितेतून मात्र मोठ्या प्रतिष्ठेने मिरवतात. ह्याची एक कारणमीमांसा देता येणे शक्य आहे. अमावस्या, पौर्णिमा, रात्र, स्मृती हे संस्कृत शब्द कठोर वर्णांनी युक्त व म्हणून स्वाभाविकपणेच कर्णकटु असे आहेत. ग्रामीण बोलीचे मात्र ह्या मूळ संस्कृत शब्दांतील कठोर वर्ण टाकून, त्यांची मधूर अशी तद्भव रूपे आपल्या बोलीमध्ये सामावून टाकली. कवींना नादमाधुर्याची जाणीव असल्याने त्यांनी ग्रामीण बोलीतील ह्या शब्दांना आपल्या कवितेत त्यांच्या माधुर्यावर लुब्ध होऊन स्थान दिलेले असावे.

मराठी ग्रामीण बोलीच्या काही वैशिष्ट्यपूर्ण अशा विशेषांचा येथे विचार केला आहे. मराठी नागर भाषेच्या तुलनेत ग्रामीण बोलीचा ह्या व अशाच इतर अंगांनी अभ्यास करणे फलदायी आहे.

□

गो. मा. पवार

१० ए, भगवंत हौसिंग सोसायटी, विजापूर रोड, सोलापूर ४१३ ००४.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका


महाराष्ट्र साहित्य परिषद

# 'प्रबंध - एकादशी' एक परामर्श

कुमुदिनी राळे

भारतीय संस्कृतीत गुरू-शिष्य परंपरा चालत आलेली आहे. गुरूंनी ज्ञानार्जन करावं आणि शिष्यांनी आदशन. कर्तव्यबुद्धीनं गुरुदक्षिणा अर्पण करावी.

अशाच गुरू-शिष्य परंपरेला अनुसरून या नव्या युगातील स्त्री-शिष्यांनी एक नाविन्यपूर्ण, वैशिष्ट्यपूर्ण अशी आगळी-वेगळी गुरुदक्षिणा आपल्या गुरूंना 'प्रबंध एकादशी' या ग्रंथानं अर्पण केली आहे. एक नवा उपक्रम, नवा ग्रंथसंभार.

हे असं अलौकिक महद्भाग्य लाभलं आहे, मराठी साहित्यात आपल्या लेखनानं बहुमूल्य भर टाकणाऱ्या, आपल्या अमोघ, रसाळ वाणीनं श्रोत्यांना मंत्रमुग्ध करणाऱ्या आणि विद्यार्थ्यांना चैतन्य देणाऱ्या प्रा. डॉ. हेमंत विष्णू इनामदार सरांना !

'प्रबंध - एकादशी' हा ग्रंथ म्हणजे डॉ. हे. वि. इनामदार यांनी मार्गदर्शित केलेल्या प्रबंधाचे सार-संकलन ! प्रस्तुत ग्रंथात डॉ. हे. वि. इनामदार यांच्या अकरा विद्यार्थिनींच्या अकरा प्रबंधाचे साररूप शोधनिबंध सादर केले आहेत. म्हणून या ग्रंथास 'प्रबंध एकादशी' हे शीर्षक दिले गेले आहे.

या अकरा शोधनिबंधाव्यतिरिक्त ग्रंथाच्या परिशिष्टामध्ये प्रा. डॉ. हे. वि. इनामदार यांचा ''विद्यापीठीय प्रबंधलेखन' पीएच. डी.चे संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शक असा एक लेख आणि त्यांच्या विद्यार्थिनी डॉ. सुचित्रा कुलकर्णी यांनी सरांच्या पंच्याहत्तरी निमित्ताने त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा घेतलेला वेध असे दोन लेख समाविष्ट आहेत.

प्रस्तुत ग्रंथात म्हटल्याप्रमाणे (डॉ. सुचित्रा कुलकर्णी यांचा 'ज्ञानमंदिरातील चैतन्यदीप' या लेखाचे शीर्षके') डॉ. हे. वि. इनामदार म्हणजे खरोखरच ज्ञानमंदिरातील चैतन्यदीप होत. या चैतन्यदीपाने आपल्या जवळ असलेले चैतन्य आपल्या विद्यार्थिनींना देऊन त्यांचे जीवन प्रकाशमय केलेले आहे.

डॉ. इनामदार यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाचे पैलू लक्षणीय आहेत. आपल्या जवळ असलेले ज्ञानाचं दान दुसऱ्याला देऊन त्याचं भवितव्य उज्ज्वल करण्याची महान कामगिरी सरांनी केलेली आहे.

मुळातच शिस्तप्रिय असलेल्या सरांनी प्रत्येक शोधनिबंधाचे मार्गदर्शन करताना प्रबंधलेखन परिपूर्ण होण्यासाठी सर्वतोपरी सहकार्य केले. त्यामुळेच या विद्यार्थिनींचे लेखनकार्य नेटाने पूर्णत्वाला पोचले.

'विद्यापीठीय प्रबंध' लेखन या लेखात त्यांनी प्रबंधाच्या अथपासून इतिपर्यंतच्या प्रत्येक बारीकसारीक गोष्टींचा विचार विद्यार्थिनींपुढे मांडला आहे.



अनुक्रमणिका

संशोधनाच्या संकल्पनेचं विवेचन करताना कोणत्याही गोष्टीचा अभ्यास आत्मनिष्ठ वा वस्तुनिष्ठ भूमिकेवरून करता येतो हे त्यांनी नमूद केलेलं आहे.

संशोधन म्हणजे अभ्यासपूर्ण रीतीने घेतलेली ती एक चौकशी असते असं ते सांगून जातात. ज्ञात किंवा अज्ञात ग्रंथ किंवा संहिता प्रकाशात आणणे हे संशोधनाचे महत्त्वाचे कार्य आहे, असंही ते सांगतात. संशोधनाचे प्रकारही त्यांनी उद्धृत केले आहेत.

प्रबंधाच्या विषयाची निवड करताना तो आपल्या आवडीचा, बंदिस्त व आटोपशीर असावा, अतिव्याप्त असू नये, तसा तो अव्याप्तही असू नये, प्रबंधाची व्याप्ती निश्चित करावी ही सूचनाही ते करतात.

विषय निवडताना दुर्लक्षित वाङ्मय प्रकार, अज्ञात वाङ्मय यावर ते भर देतात. विषयांचा चिकित्सक अभ्यास कोणत्या प्रकारे करावा? कोणते मुद्दे घ्यावे याचं त्यांचं विवेचन मोठं लक्षणीय आहे.

प्रबंधाची पूर्वतयारी करताना नावनोंदणीपासून मार्गदर्शकापर्यंतच्या सर्व गोष्टींची माहिती करून देताना मार्गदर्शन करताना त्यांच्यामधील सच्चा शिक्षकाचे आणि काटेकोर मार्गदर्शकाचे दर्शन घडते.

प्रबंधाची तयारी करताना विषयाचे औचित्य, पूर्वाभ्यासाचे स्वरूप व प्रस्तुत अभ्यासाची दिशा या तीन मुद्द्यांना धरून रूपरेषा तयार करावी हे सांगून सूची कशी करावी, याचेही विस्तृत विवेचन करण्यास ते विसरत नाहीत.

कोणतेही लेखन नेटकेपणानं व्हावं यावर त्यांचा भर असल्याने ते म्हणतात— अभ्यासातून केलेल्या विचार-विनिमयातून



**अभीष्टचिंतन**

डॉ. हेमंत विष्णू इनामदार
जन्म : ३ नोव्हेंबर १९२५
(अमृतमहोत्सवी वर्षात पदार्पण)
एम. ए., एलएल. बी., पीएच. डी. (मराठी)
मराठीचे अध्यापन, श्री. ना. दा. ठा., महिला महाविद्यालय, पुणे.
१९५४ ते १९८५ प्राचार्य व मराठीचे प्रमुख प्राध्यापक म्हणून निवृत्त.
विद्यापीठ पातळीवरील उत्कृष्ट शिक्षक म्हणून पुणे महानगरपालिकेचा पुरस्कार
शासनाचा राज्यपुरस्कार १९७९
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी उपाध्यक्ष.
साहित्यसेवा : बेबंदशाहीचे नाट्यसौदर्य, आश्रमहरिणीचे अंतरंग, संत नामदेव, भक्तिपंथ-नवचिंतन, संत सावतादर्शन, श्रीज्ञानेश्वर आणि संतमंडळ, वेध ज्ञानेशाचा अभंग नवनीत, आस्वाद ज्ञानेश्वरीचा, हा होईल दान पसावो, गं. वा. सरदार व्यक्ती आणि कार्य, नामा म्हणे, भक्तिमंदिरातील नंदादीप.
संपादित पुस्तके : हरी नारायण आपटे व्यक्ती आणि वाङ्मय, अपेक्षा, शरदचंद्र, संत एकनाथ दर्शन, संत नामदेव काव्यसंभार आणि संत परिवार. आधुनिक भारतीय तत्वज्ञ, याशिवाय सहकार्याने अनेक पुस्तकांचे लेखन आणि संपादन.










संशोधनाचे समग्र चित्र आपल्या मन:चक्षुपुढे उभे राहिले पाहिजे. प्रबंधाची भाषाशैली अचूक, अल्पाक्षर आणि अर्थबहुल असावी, असे ते सुचवितात.

प्रबंधाचे टंकलेखन, तपासणी, परीक्षा अर्जाची तयारी, प्रबंधाची तपासणी, ग्रंथसिद्धी यांचे अचूक पण नियमबद्ध मार्गदर्शन करून विद्यार्थ्यांना प्रबंध लेखनास उद्युक्त करतात, प्रोत्साहन देतात. तसेच मानसिक बळही देतात. असे गुरुजन लाभलेले विद्यार्थी भाग्यवान म्हटले पाहिजेत.

डॉ. हे. वि. इनामदारांचा हा 'विद्यापीठीय प्रबंध लेखन' लेख वाचल्यावर कोणत्याही विद्यार्थ्याच्या मनात प्रबंधाविषयी साशंकता राहणार नाही.

डॉ. इनामदार यांच्या लेखाव्यतिरिक्त त्यांच्या अकरा विद्यार्थिनींच्या प्रबंधाचे साररूप निबंध प्रस्तुत ग्रंथात सिद्ध आहेत. सरांच्या मार्गदर्शनाखाली अभ्यासलेल्या प्रबंधांचे विषयात वैविध्य तर आहेच आणि योग्य ते निकष लावून ते सादर केलेले आहेत. या अकरा प्रबंधापैकी तीन संतसाहित्यविषयक, तीन ग्रंथकाराभ्यासासंबंधी, दोन काव्यविषयक, एक कथावाङ्मयाविषयी, एक कादंबरीविषयक आणि एक नाट्यविषयक अशी वैविध्यपूर्ण विषयांची विभागणी झालेली आहे.

(१) 'अर्वाचीन मराठी काव्याची घडण' (इ.स. १८१८ ते १८८५) या प्रबंधात अर्वाचीन काव्यसंपदेच्या पूर्वपीठिकेचा शोध घेण्याचा प्रयत्न डॉ. वंदना अकोलकर यांनी केलेला आहे.

केशवसुतांसारख्या महान कवीने काव्यक्षेत्रात पदार्पण करून क्रांतीचा झेंडा फडकवला. त्यामुळे उदो उदो झाला केशवसुतांचा; परंतु पूर्वप्रयत्न करणारा मधला कालखंड (१८१८ ते १८८५) हा मात्र उपेक्षित राहिला, असे मत वंदना अकोलकर यांनी प्रबंधात मांडले आहे.

(२) पौराणिक नाट्यसृष्टी - सामाजिक वाङ्मयीन अभ्यास (इ. स. १८८० ते १९३५)

पौराणिक नाटकातील विषय केवळ मनोरंजनात्मक नसून तत्कालीन सामाजिकतेचे स्वरूप विशद करून लोकजागृती करणारे असत. अशा पौराणिक नाटकांचे मूल्यांकन करणे, त्यातील विशेष मूल्यांची नोंद करणे हा या अभ्यासामागील उद्देश आहे, प्रमुख भूमिका आहे. पौराणिक नाट्यकृती आणि समाजप्रबोधन यांचा परामर्ष डॉ. शकुंतला लिमये यांनी घेतला आहे.

(३) श्रीधर स्वामी नाझरेकर यांचे काव्य धार्मिक प्रतिष्ठा प्राप्त झालेल्या श्रीधरांच्या वाङ्मयाचा जुन्या-नव्या वाङ्मयीन संकल्पाच्या प्रकाशात मूल्यमापनात्मक अभ्यास डॉ. ललिता मिरजकर यांनी त्यांच्या प्रबंधात सादर केला आहे.

(४) 'स्त्रियांनी लिहिलेले मराठी कथावाङ्मय' (इ. स. १८८५ ते १९७५) या नव्वद वर्षांच्या कालखंडातील कथेच्या विश्वात झळकलेल्या अग्रगण्य लेखिकांचा सविस्तरपणे घेतलेला परामर्ष तसेच अन्य लेखिकांच्या कथांचा मागोवा डॉ. अंजली सोमण यांच्या या प्रबंधात समाविष्ट आहे. स्त्रियांचे मराठी कथेतील योगदान समजून घेण्यासाठी आणि स्त्रीवादाची कच्ची सामग्री म्हणून प्रस्तुत प्रबंध अनेकांना उपयुक्त वाटेल.

(५) 'मराठी ऐतिहासिक कादंबरीतील शिवप्रतिमा' या डॉ. उषा शिराळकर यांच्या प्रबंधात शिवाजीमहाराजांची व्यक्तिरेखा कशी व कोणत्या प्रकारे रेखाटली गेली आहे, याचा शोध आहे.

(६) 'अर्वाचीन मराठी कवयित्रींची कविता - एक चिकित्सक अभ्यास' (इ. स. १८८५

ते १९७०) आधुनिक कवितेच्या अंतरंग-बहिरंग यात झालेल्या मूलगामी परिवर्तनाच्या ठळक खुणा कवयित्रींच्या काव्यात कशा आढळतात याचा शोध तत्कालीन वाङ्मयीन, सामाजिक व राजकीय पार्श्वभूमीचे भान ठेवून डॉ. मंदा खांडगे यांनी घेतला आहे. कवयित्रींच्या काव्यात जीवनातील संघर्ष, स्त्री-समस्या यांचे घडणारे दर्शन अपुरे आहे, तसेच अनेक प्रश्न दुर्लक्षित राहिले. या मर्यादांची कारणमीमांसा या संशोधनात केली गेली आहे.

(७) 'अनंत बाळकृष्ण अंतरकर एक चिकित्सक अभ्यास' - संपादक, लेखक, वृत्तपत्रीय काम करणारे म्हणून अनंत बाळकृष्ण अंतरकर यांनी मराठी साहित्याच्या क्षेत्रात बजावलेल्या कामगिरीचा चिकित्सक अभ्यास डॉ. अनुराधा औरंगाबादकर यांनी त्यांच्या प्रबंधात सादर केला आहे.

(८) 'श्रीगिरिधरस्वामी - एक चिकित्सक अभ्यास'- रामदास-शिष्य श्रीगिरिधरस्वामी यांच्या विपुल वाङ्मय संभाराकडे दुर्लक्ष होऊ नये, म्हणून या कवीच्या ग्रंथसंपदेचे संशोधन करून त्यांच्या वाङ्मयाचा सविस्तर परिचय करून देण्याची कामगिरी बजावली आहे कै. डॉ. शकुंतला कानडे यांनी.

(९) 'संत निवृत्तीनाथ -एक चिकित्सक अभ्यास' - निवृत्तीनाथांचे लेखन स्फुट स्वरूपाचे असले तरी एकूण कार्य सांस्कृतिक स्वरूपाचे आहे. या सत्पुरुषाच्या विचारांचा सर्वंकष अभ्यास हेच या संशोधनाचे वैशिष्ट्य असून डॉ. किशोरी वेलसरे यांच्या प्रबंधाचे हेच मर्महीआहे.

(१०) 'व्यंकटेश माळगूळकर - एक चिकित्सक अभ्यास' - कथा, कादंबरी, ललित, वगनाट्य अशा व्यंकटेश माडगूळकरांच्या अनेकविध वाङ्मयप्रकारांच्या, कलाकृतींच्या विश्लेषणावर भर देऊन केलेला हा चिकित्सक अभ्यास डॉ. सुप्रिया अत्रे यांनी सदर प्रबंधात सादर केला आहे. त्यांनी माडगूळकरांच्या साहित्याचे केलेले विवेचन, निष्कर्ष लक्षणीय आहेत.

(११) 'आचार्य अत्रे यांचे अग्रलेख- एक चिकित्सक अभ्यास'

प्रस्तुत प्रबंधात आचार्य अत्रे यांच्या वैशिष्टपूर्ण अग्रलेखांचे वर्गीकरण करून त्यांचे अग्रलेखांचे स्वरूप कसे बदलत गेले याचा मागोवा डॉ. सुचित्रा कुलकर्णी यांनी घेतला असून अत्र्यांचे वेगळेपण त्यांच्या सूक्ष्म लालित्य, काव्यमयता, चिंतनपरता या अंगभूत गुणातून कसे सिद्ध होते, याची चिकित्सा या संशोधनातून व्यक्त केली गेली आहे.

परिशिष्टातील शेवटच्या लेखात डॉ. सुचित्रा कुलकर्णी यांनी आपले गुरुवर्य प्रा. डॉ. हे. वि. इनामदार यांची घेतलेली मुलाखत आहे. 'ज्ञानमंदिरातील चैतन्यदीप' या शीर्षकाने रेखाटलेल्या लेखात सरांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाचे, एका यशस्वी प्राचार्याचे, समंजस विचारवंताचे, चारित्र्यसंपन्न अशा बुद्धिमान सुजन सुहृदाचे दर्शन घडवले आहे.

'प्रबंध एकादशी' या ग्रंथाद्वारे डॉ. हे. वि. इनामदार यांनी मार्गदर्शित केलेल्या प्रबंधांचे सारसंकलन, साररूप शोधनिबंधाचे औचित्य साधले गेले आहे. यातून इनामदारांच्या विषय निवडीबाबतच्या कल्पकतेचे, चातुर्याचे दर्शन होते. उपेक्षित विषयांना, ग्रंथकारांना,

